# नवभारत

## या अंकात –



वर्ष २७
अंक साहवा
मार्च १९७४
रु. १-२५

अनुक्रमणिका







राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई




नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

प्राज्ञपाठशाळामंडळ वाई, यांचे मासिक

वर्ष सत्ताविसावे अंक साहवा

# नवभारत

मार्च १९७४

( महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृति मंडळ पुरस्कृत )

संपादक-मंडळ

प्रा. वि. म. बेडेकर—प्रा. गोवर्धन पारीख, प्रा. मे. पुं. रेगे का. संपादक



वार्षिक रु. १२ अंकास रु. १·२५

हे मासिक श्री. म. शं. साठे यांनी दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथे छापून प्रा. वि. म. बेडेकर यांनी प्राज्ञपाठशाळामंडळ वाई यांचेकरिता तेथेच प्रसिद्ध केले.

पत्रव्यवहाराचा पत्ता :

१ संपादकीय : कार्यकारी संपादक, 'नवभारत' मासिक, प्राध्यापकांचे निवासस्थान कीर्ति कॉलेज, दादर-मुंबई २८

२ व्यवस्थापकीय : व्यवस्थापक, 'नवभारत' मासिक, C/o दी प्राज्ञ प्रेस, वाई ( जि० सातारा )

३ चौकशी : श्री. वा. वि. कोनकर १८८ एफ्, भीमरावबाडी, मुंबई २ फोन नं. ३५४८५४

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

श्री. शं. बा. जोशी

# 'हिंदु' धर्मात झालेली –
# ही उलटापालट भयावह आहे!

( मोक्षवादी पुरातन धर्मपंथातून सर्वत्र दिसणारी ही संक्राती उलटचा दिशेने धावत आहे !

" Religions (particular) are objectionable in many ways, But religious perspective is essential to the welfare of Mankind" – Ruth Nanda Anshen

( in Preface to the "Symbol and Values in zoroastrianism", Harper 8 Row N. Y.)

## १) या उलटापालटीची पार्श्वभूमी तात्त्विक स्वरूपाची आहे

तात्त्विक, सार्वकालिक 'सत्य' हे सांकेतिक असते: पण ही सांकेतिकता, दिक्-काल–परिसरांतील विशिष्ट घटना वा प्रसंग, अशा कांही निमित्तामुळेच दृष्टोत्पत्तीस आलेली असते. ऋतुमानात होणाऱ्या बदलाच्या संदर्भात 'संक्रांती'ची चाल रूढ झालेली दिसते. पण या विशिष्ट घटनेच्या निमित्ताने, सांकेतिक पातळीवर दिसणारी 'संक्राति' तत्त्वाची ही प्रतिमा, सार्वकालिक पातळीवरील अर्थ: विचाराचे प्रतीकही वाटावी, हे आश्चर्यकारक नव्हे काय ?

'संक्रांत' भयावह मानली जाते; कारण हे स्थित्यंतर घडामोडीस कारण होत असते पण वाईटातून चांगलेही काही होत असते. आणि 'संक्रांती'च्या चालीत 'तिळाला,' तिलतर्पणाला व तीळ–गुळाला जागा दिली आहे; आणि 'भयावह' असला तरी हा 'सण' मानला जातो ! 'संक्रांती'-देवी सरळ दिशेनी जात नसते ! पूर्वेस तोंड तर पश्चिमेकडची उलटी चाल असल्याचेही सांगितले जाते. आणि ही संक्रांतीदेवी वाहन म्हणून गाढवासारखे ओंगळ प्राणीही स्वीकारते !



अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

'संक्रांत' या विशिष्ट आचारविधीच्या निमित्ताने ध्वनित होणारा तात्विक पातळीवरील विचार हा सार्वकालिक नियमाच्या स्वरूपात दिसू लागतो. ऐतिहासिक स्वरूपाच्या राजकीय– सामाजिक– धार्मिक क्रांतीत याचा पडताळा मिळतो. अनेक 'विशिष्ट' वाटणाऱ्या घटनांतील अंतरार्थ समान आकृतीचा असतो: आणि अशा अर्थ : विचाराच्या प्रकाशात 'विशिष्ट' हे अर्थाच्या कक्षेत येत असते. हे खरे असेल तर, 'विशिष्ट' वाटणारे मोक्षार्थी सर्वही पुरातन धर्मांतून काही एक उलटा-पालट झाल्याचा पडताळा इतिहासात मिळावा. नमुन्याकरता ही उदाहरणे पाहा :

१) 'सोम'वार; हे या वाराचे मूळ नाव नसावे; कारण पाश्चात्य परंपरेत monday हे नाव प्रचलित आहे. हे खरे असल्यास या पुढचा प्रश्न; असे होण्याने काय साधले ? पण अशा स्थित्यंतरामुळे तत्कालीन धार्मिक व सामाजिक क्रांतीची सूचना मिळत असते; आणि अशा स्थित्यंतराची खात्री पटवणारे पुरावे बरेच मिळावे लागतात. तेव्हा हे का झाले ते कळू शकते. चंद्राला 'सोम' हे नाव वेदकालीच प्राप्त झाले हे सर्वमान्य आहे. हे का ? पुढे कळेल.

प्रथम 'सोम' संकेत प्रकाशपूजकाचा होता, हे ऋग्वेदाप्रमाणे, अवेस्ता-ग्रंथावरूनही निश्चित होत आहे. 'चंद्र' हा संकेत, आप ( रस : रेत : शुक्र ) पूजकांचा होता; 'आप' संप्रदायाने 'सोम' ( प्रकाशपूजक ) संप्रदायावर मात केली. या जीवनस्पर्धेत 'प्रकाश' ( सौर ) पूजक हरले; 'आप' संप्रदायाच्या प्रभावात, 'चंद्र' हाच 'सोम' ( रस ) असे मानले गेले. ( सत्य-कथा, मार्च, ७३ ).

२) 'रवि' = आदित्य ( वार ) होण्यात पर्यायाने वरील संक्रांतीच दिसेल : 'आदित्य' हा कुमारी माता ( : अदिति ) पुत्र होय ही क्रांतीही ऋग्वेदांत दडली आहे. विश्वजननी; आदिमाता: जिचे 'अमृतस्य नाभिः ( केंद्र ) अशा आकृति-स्वरूपात दर्शन घडवले जाते. ती 'चंद्र' ( चमस : पानपात्र ) स्वरूपात, ऋग्वेदात दिसेल. या संदर्भात 'चंद्रा: आप:' ही सांकेतिक प्रतिमा, ( हिरण्यगर्भ दैवतस्तोत्रात येणारी ) संस्मरणीय आहे.

'चमस ( पानपात्र )' रूपी 'चंद्र', प्रथम स्त्रीलिंगी असण्यात अंत:संगती आहे. पाश्चात्य परंपरेत 'चंद्र' स्त्रीलिंगीच आहे ! पण ऋग्वेदांत चंद्र-मस् हा जोड संकेत पुंलिंगी आढळतो ! पण माननीय वै. का. राजवाडे यानी हा समानार्थी जोडशब्द Tautology समानार्थी असल्याचे उघडकीस आणले आहे. हे दोनी विभिन्न भाषिक संकेत असल्याचे 'मऱ्हाटी संस्कृति : कांही समस्या' यात

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

विवेचन आले आहे. ‘ चंद्र ’‘ सोम ’ होण्याच्या संधिकाळातच स्त्रीलिंगी ‘ चंद्र ’ पुल्लिंगी बनला असावा, असे निराळ्या दिशेनेही कळू शकते.

‘ रवी ’ ला ‘ आदित्य ’ बनविण्यात, सूर्याला पर्यायाने ‘ चंद्र ’ केल्यासारखे होत आहे ! कारण ‘आदित्य ’ म्हणजे हा ‘ अदिति पुत्र ’ असाच अर्थ वेदमान्य आहे. ‘ अदिति ’ ही आप : रस : सलिल स्वरूपी मानली जाते. म्हणून अदिति पुत्र–आदित्य हा ‘आपोवत्स ’ म्हणजे चंद्रच होय ! समुद्रमंथनाच्या कथेत, ‘ चतुर्दश रत्नापैकी ‘ चंद्र’ ही एक वर आल्याचे वर्णन सुप्रसिद्ध आहे.

‘ आदित्य ’ वार हे नाव कुमारी मातेच्या पुत्राशी जोडले जाते ! याच स्वरूपाचे स्थित्यंतर पाश्चात्य परंपरेतही झालेले दिसेल ! हिब्रूपंथानंतरचा ख्रिस्ती संप्रदाय, हिब्रु परंपरेत शनिवार हा ‘सातवा ’ : Sabbath दिन मानला जातो. पण ख्रिस्तपरंपरेत मेरी कुमारी मातेच्या सुपुत्राच्या स्मृतीशी निगडित ‘ सातवा ’ sabbath दिन, रविवार ठरतो ! आणि ख्रिस्ताला : ‘ Sun of Righteousness म्हणण्यात सौर = मित्र संप्रदायाचा प्रभाव आहे, असे सांगतात.

भारतातील ही उलथापालथ प्रचलित ऋग्वेदपाठाइतकी प्राचीन आहे. या पल्लटांत १ ) चंद्राला ‘ प्रकाश ’ पूजकातील शिष्टमान्य संकेतांच्या पातळीवर आणून बसवण्याचा एक प्रयत्न दिसतो, उदा : चंद्राला सोम ’ म्हणणे; ‘ स्वर्-भानु ’ नावाने वर्णन करणे ( V. ४० ); ‘ मार्तंड ’ ( नामानं सूर्य ) ( X. ७२. ८, ९ ) वगैरे. २ ) या उलट सूर्याला खाली ओढून चंद्राच्या पातळीवर आणणे. उदा ; ‘ आदित्य ’; सूर्यनारायण, हा दुसरा संकेत वेदात उघड नाही; पण पडद्यात आहे : ‘ पुरुष ’ सूक्तातील, ‘ सहस्राक्ष पुरुष हा एकाक्ष नाग = नारायण होय. ( नवभारत, एप्रिल ७२ )

आदि ‘ पुरुष ’ रूपी ही नाग प्रतिमा पूर्वी आदिमाता म्हणवीत असे. आणि या आदिमाता संप्रदायाचा सुफलीकरणतंत्राशी ( Fertility–Cult ) असलेला अतूट संबंध, मानवशास्त्रसंशोधकानी प्रकाशात आणला आहे. ऋग्वेदात या ‘ चंद्रा ’ कुमारी = सिनीवालीचे वर्णन ( दुसऱ्या ) प्राचीन मंडळात येते. याच मंडळांतील ‘ अपां–नपात् ’ = आपोवत्साचे सूक्तही अभ्यसनीय आहे. ( II. ३५ ).

हा आपोवत्स ‘ चंद्र–मस् ’ रूपी, सोमरूपी शेवटी ‘ पुरुष ’ रूपी होतो ! पण या भूमिकेतही हे ‘ पात्र ’ आपले गुण उधळते; या पुरातन संप्रदायाचे

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

संरक्षक, पुराणकथा लिहितात : हा 'चंद्र' (पुरुष) 'दक्ष' कन्या तारकांच्या नादी लागतो! याला 'क्षया'ची बाधा होते! या एकेका नामरूपातीलही सांकेतिकता किती औचित्यपूर्ण आहे, हे शब्दांनी सांगण्याची जरूरी दिसत नाही.

प्रचलित ऋग्वेद संहितेत दिसून येणाऱ्या या स्थित्यंतरात आप (रस : रेत : शुक्र) चंद्र या संप्रदायाचा वरचष्मा झालेला दिसतो; 'प्रकाश' तत्त्वाच्या सवितृ (सूर्य), इंद्र, जातवेद अग्नी या प्रकारच्या (सौर) प्रतिमांचे अवमूल्यन झालेले दिसते. 'वरुण', 'सोमा'दि नावामागे लपविला जाणारा हा चंद्र वेदात कोठेही उजळ माथ्याने स्वतःच्या नामरूपात पूजिला जाऊ नये, याचा अर्थ काय? 'चंद्र'–बाधा (: चंद्रापीड) होण्यावरच बाण कवीची 'कादंबरी' रचलेली आहे. कवी नाम 'बाण'! moon-struck, moon's calf, Lunacy अशा प्रकारचे पाश्चात्य संकेतही, भारतीय परंपरेतील 'चंद्रा' नुभवाशी' सुसंगत दिसतात.

वेदकालीन वरील उदाहरणातून, हा झगडा, चंद्राला सूर्य बनविण्याच्या संदर्भात संभवलेला दिसतो. 'चंद्र' आपले 'राजन्' 'सम्राट' पद, सदा, दिवसाही टिकावे म्हणून टपलेला असतो. रात्रच दिवसा हा फरक नको वाटतो चंद्रापीडांना! सर्व प्रथम चंद्रसंप्रदायच प्रचलित होता; हा मागे पडून सूर्य (: प्रकाश) पूजक संप्रदाय प्रतिष्ठित होऊ पाहत असताना, किंवा सूर्यपूजा थोडीफार वर्चस्वी होऊ लागण्याच्या सुमारास ही सं-क्रांती झालेली दिसते. या अनु-मानाला, भारतातील 'पंचांग' पद्धतीकडूनही दुजोरा मिळत आहे. भारतात सौरकाल-गणनेपूर्वी, चांद्र कालगणनाच प्रचलित होती. आजही 'पंचांग' चांद्रमानाशी, प्राधान्येकरून जुळणारे आहे! 'अधिक' मासाची भर घालून सौरगतीशी हात मिळवण्याचा प्रयत्न होत आहे.

मानवाला भौत 'काल' गतीची जाण (consciousness) येण्यास 'चंद्रा'ची उपासना कारण आहे. (नवभारत, सप्टें. ७३; पा. ९६), 'चंद्र' प्रथम स्त्रीरूपी; नंतर 'चंद्र' पुं, रूपी, जसे, तसेच या 'चंद्रा' समागमांत आलेली 'काल-गती'ची अनुभूतीसुद्धा प्रथम स्त्रीरूपातच कल्पिली असणार अर्थात् 'काल' पुरुषरूप कालीनंतरचे आहे! 'काली' 'कराली' (स्त्री) हे रूपच सर्वप्रथम होते. रशियन् भाषेत 'मृत्यु' स्त्रीलिंगी असल्याचे ऐकले; खरे असेल तर, हा अनुभव शाक्त संप्रदायाच्या पार्श्वभूमीवरचा असला पाहिजे, हे उघड आहे. 'कालोऽस्मि' म्हणणारा हा कृष्ण (वर्णी) कालदेव होय;

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

आनंदतीर्थ, महाभारत तात्पर्यनिर्णयात, द्रौपदी ही ' चंद्रा ' काली इति उच्यते ' असे सांगतात ! ( २.२९ ), आणि ( ' कृष्ण '-द्वीप- अयन: ) व्यासाची साक्ष : महाभारतांत द्रौपदीला-कृष्णा हे पर्याय नाव आहे ! आणि कृष्णजन्मकथेतील एक कबूली अशी आहे की — काली=शक्तीरूपी कन्येच्या जागी ' कृष्ण ' आहे ! आणि सृष्टि-निर्मितीस कारण रूपकाल-काली, ही घटना भौत ऐंद्रियक पातळी-वरील ( Organic Time ) काल गतीची असणार ! भौतशास्त्रात, यालाच Biological time म्हणतात. या मानवीय व्यवहारात दोन प्रकारचे, दोन विभिन्न पातळीवरचे, ' काल ' अनुसरणे अटळ आहे, – या नराला ( नळाला ), ऐंद्रियक ( organic ) म्हणजे, आप : रस : रेत पातळीवरील ( biosphere ) अस्तित्व तगवण्यासाठी, अनुसरणे अ–टळ असणारा ' काळ '; हा ' रात्र ' संप्रदायाचा ' चांद्र ' काल होय. सर्व प्रथम परिचय घडतो, तो या भौतपातळीवरील काळाचाच असणार. हा लैंगिक पातळीवरील सृजनास कारण रूप ( ' काम'ना ) काल; हा काल ' आदि पुरुष ' ( " पुरि–शय " ) ' एकाक्ष ' नाग = ' चंद्रा 'च्या रूपाने वेदात वर्णिला गेला आहे. ( नवभारत एप्रिल ७२ ) वेदोपनिषदांतील ' एकं सत् ' रूपी ' एको देवा 'चा संत-महंत संप्रदाय तो हाच होय.

२ ) सांस्कृतिक सृष्टीस प्रेरक, पोषक व आधारभूत असणारा हा ' काल ' ' समय ' या संकेताने सूचित झालेला दिसतो, फार पुरातन काळा-पासूनच वेदांत हे दोनी काल अभिप्रेत आहेत ! लेव्हिस्ट्राससारखे आधुनिक शास्त्रज्ञ मंडळी याला ' Social time ' म्हणावे असे सुचवितात. पण सांस्कृतिक व धार्मिक आचारांच्या संदर्भात प्रथम डोकावणारा हा ' समय ' रूपी काल, हा ( केवळ ) सामाजिक म्हणणे प्रशस्त दिसत नाही.

पहिला भौत ऐंद्रियिक प्रवृत्तिप्रेरक काल याचा पुरातन काळी ' चंद्रा 'शी संबंध जोडला गेला. भौत सृजनास अवश्यक मासिक पाळी ( menstrual flow ), ' चंद्रा 'शी निगडित असल्याचे त्याना दिसून आले; कालरूपांत आदि अनुभव ' चंद्रा 'चा; या ' चंद्रा ' स्त्रीचे परिवर्तन होऊन ' पुरुष ' चंद्र (-मस्) झाला ' मोहिनी-राज ' तो हाच होय. तरी अपवादाचा कलंक ( चंद्रबिंबावरचा ) धुऊन निघेना; तेव्हा ही प्रतिमा सूर्याचा वेष घेते ! पण पुढे ' सूर्य ' ही उभय-लिंगी बनला ! ' चांद्र ' संप्रदायाच्या वैशिष्टयाला जुळता मिळता होतो ! म्हणजे सौरभूमिका ' चांद्र ' होते. ' A Femele Mitras ' प्रतिमा उघडकीस येते ( ' Symbols in Zoroastrianism ' p. 101 हा ' सौर ' पंथ. )

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

पण, प्राचीन काळीच काय, आज सुद्धा, समयोचित परिभाषेच्या अभावी उत्पन्न होणाऱ्या 'अंधारात' अशी संदिग्धता रहात येत असते. सर्व प्रथमच्या रात्री-उपासनेत प्रतीतीस आलेल्या पहिल्या काळाला 'चांद्र' मान म्हटल्याने, त्यानंतर 'उपज्ञेच्या' अरुणोदयाबरोबर, कळू लागणारा दुसरा काल, 'सौर' म्हणून ठरलेला दिसतो. येथे खरोखर सूर्याचा प्रत्यक्ष संबंध नाही हा सांकेतिक सूर्य ( सवितृ ) होय.

खरोखर काल (Time) ही धारणा केवळ तात्त्विक : सांकेतिक पातळी-वरची आहे ! यामुळे 'काल' हा केवळ काल्पनिक म्हणून म्हणणारा, व हा जीवनानुभवच खोटा मानणारा एक वर्ग आहे ! 'काला'चा 'स्थलाशी' अ-विचलित संबंध असतो; भौत-कालानुभूती ही भौत-जीवनपरिसराशीच संबद्ध असणार, पण भौतपातळीवरील सर्वच प्राण्यांत भौतकालानुभूतीची स्मृती जागी असते, असे म्हणण्यास जागा नाही. चेतना-चेतसरूपी भौतपातळीची अस्पष्ट जाण असते पण चेतस-प्रज्ञा मानवाचे वैशिष्टच होय. मानवाला 'गवसलेल्या' भाषिक माध्यमामुळे ही स्मृती, ही जाण ( Consciousness of Consciousness ) तगणे शक्य होत आले आहे ! भौतकालानुभूती ही 'चंद्रा'मुळे डोकावली; पुरातन धर्मपंथांनी हे अतिप्राचीन काळीच हेरले आहे. 'वाक्'देवी ( वेदांत वागांभृणी, सरस्वती इत्यादि), ग्रीक अथेने, याचे प्रत्यंतर देतात. 'आंभृणी' व अथेना या देवी आपल्या 'बापाच्या' डोक्यातून जन्मल्या ! 'आदं'ला 'ज्ञान' वृक्ष फळ हे ईव्ह ( स्त्री ) देते ! पण हा 'चंद्रा: आप:'चा 'रसानंद' मानवच तगवतो कसा ? हा प्रश्न 'वेड' लावणारा आहे ! 'पुरू-रव्वा'ची प्रतिमा बोलकी आहे !

मानवात डोकावणारी 'उप-ज्ञा' रूपी जाण ही काय चीज आहे, याचा शोध घेण्याच्या मार्गावरच या जगात दिव्य दैवतकथा पुढे आल्या. विविध शास्त्रांचा शोध झाला. पण धर्म व संस्कृति वाढत आहे काय ? मानव समाजाची ही प्र-गती ? वा ही परा-गती ? भौतशास्त्रांचे क्षेत्र सोडल्यास, धर्म व संस्कृति या क्षेत्रातील विचारात प्रगती ऐवजी परा-गतीच का ? याला मुख्य कारण, प्रचलित हे धर्मपंथ 'Illegitimate Abstractions'वर अधिष्ठित आहेत ! यामुळेच अर्थात् आचारातही विकृती डोकावलेली आहे ! आज 'चांगले' आणि 'वाईट' हे ठरविणेच अशक्य आहे, अशा निष्कर्षाच्या या युगात जीवनमूल्ये काल्पनिक ठरावी हे स्वाभाविक आहे.

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

पण, 'उपज्ञा' विकासाच्या पार्श्वभूमीवर, (जागतिक पातळीवरील) ही संक्रांती, का ओढवली आहे, हे दृष्टिपथांत येईल अशी आशा आहे. 'उप-ज्ञा' हा संकेत आज अत्यंत स्थूल आहे; यामुळे उप-ज्ञा–उपज्ञा यात असणारा सूक्ष्म फरक लक्षात येणे आज दुष्कर झाले आहे. मानवी मनातील 'उप-ज्ञा' ही अखंडित 'एकं' स्वरूपाची नाही ! उपज्ञेची 'जाण' देणारी आणखीही एक 'उपज्ञा' ही मानवात दडली आहे ! 'Consciousness of Consciousness' हा अनुभव आहे. प्रत्येक विचारी, विवेकी मानव हा अनुभव घेऊ शकतो. यात सं-कल्पनेचा हात नाही. हे खरे असल्यास जशी प्राथमिक 'उपज्ञा', 'चांद्र' भौत पातळीवरची, तशी उपज्ञेची 'उपज्ञा' ही अभौत प्रकाशरूप (सौर) तात्त्विक पातळीवरची ठरते, केवळ भौत चेतनेला 'प्रज्ञा' स्वरूपाची जाण नसते. प्रज्ञेला चेतसाचा आधार असला तरी ही प्रज्ञा चेतसाहून वेगळी दिसते.

मोक्षवादी हिंदु, ख्रिस्ती- अशा धर्मपंथांत आढळणारे 'चांद्र' व 'सौर' सांकेतिक प्रतिज्ञातील द्वंद्व, असे हे तात्त्विक पातळीवरचे आहे : 'चंद्रा'च्या योगे प्रतीतील आलेल्या प्राथमिक व प्रमाथी (primordial) भौत ऐंद्रियिक पातळीवरील काळाच्या जाणिवेपुढे, तात्त्विक : सांकेतिक पातळीवरील 'प्रकाश' स्वरूप (सौर) काल : समयाची ही (जाण : प्रज्ञा), न-गण्य ठरत आहे ! मानव संस्कृतीवर ओढवत असलेल्या आपत्तीची पाळेमुळे, येथे 'समय' पालनाची अवज्ञा होण्यात आणि भौतकाळाला शरण जाण्यात पोषिली जात असलेली दिसत आहे. ही गोष्ट, आणखी एका दिशेनेही उघडकीस येत आहे.

## २) 'चांद्र' उपस्थान, मृत्यु-स्वरूप ठरणे अटळ होय

जगावर वर्चस्व गाजवू पाहणाऱ्या संत-महंत-महानुभावांचा प्रचलित धर्मसंप्रदाय, हा 'हिंदु' या नावाचा असो; ख्रिस्त, बौद्ध, जैनादि कोणत्याही नामविशिष्ट अभिनिवेशाचे ते असोत; हे सर्वही मुळात 'चंद्रो'पासनेच्या पार्श्वभूमीवर पोषित आहेत.

सामान्यतः सर्व प्रथम 'चंद्रोपासना सर्वत्र चालत होती; पुढे बऱ्याच कालांतराने 'सूर्य' उपासना डोकावते. पण चंद्रोपासनेतील आकर्षण सूर्योपासनेत नसल्याने, 'चंद्र' संप्रदाय वर्चस्वी ठरतो. मानवेतिहासाच्या आरंभी झालेले हे स्थित्यंतर दुर्लक्षित राहिले आहे, आजवर. पण मानवसंस्कृतीचा आढावा घेताना, कोठेतरी दिशाभूल झाल्याचे दाखले दिसू लागतात. अलीकडील युरोपात झालेल्या 'मिथ्र' (मित्र-सूर्य) संप्रदायाच्या प्रभावाचे


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

संशोधन भारतीय गतकालीन सौरसंप्रदायाच्या प्रभावाला पुष्टी देत आहे. नमुन्यादाखल या संस्कृतीतील आठवड्यांच्या नावात झालेल्या स्थित्यंतराची दोन उदाहरणे सांगितली; याची कारणे दोन प्रकारची सांगितली. यातील तात्त्विक स्वरूपाचा दुसरा पुरावा बिनतोड आहे. भौत ऐंद्रियक पातळीवरील ( Biological ) 'काळ' हा सृजनाशी संबद्ध असतो; चंद्राला वेदात, 'प्रजापति' असे पर्याय नाव असून, 'सं-वत्सरः वै प्रजापतिः' (प्र. उ. १.९) असे उपनिषद् सांगते. हा 'आपोवत्सः' चंद्र 'वत्सरा'ना जन्म देतो; या भावनेतील अंतःसंगती तपासून पहावी.

'चंद्र' व 'सूर्य' ही नावे सांकेतिक आहेत. तरीपण या माध्यमातून व्यक्त होणारा अर्थ जीवनातील आचार-विचारावर प्रकाश टाकीत असतो. 'चंद्राला' आपले नाव 'बुद्दू' झाल्यासारखे वाटते; नामांतर होते, या घटनेमागे चंद्रोपासकांचाच हात असावा; या गोष्टीला दुसरीकडूनही दुजोरा मिळतो. चंद्राला सूर्याच्या पातळीवर आणण्याचा प्रयत्न 'सूर्यः नारायण' अशाप्रकारच्या शब्दप्रतिमेत उघडकीस येत आहे.

'चंद्रोपासना 'मृत्यू' कवटाळण्यास प्रवृत्त करते' हे सूत्र पुरातन धर्मग्रंथातील आचार आणि विचार या दोनीतूनही प्रतीतीस येते. हिंदूत 'चंद्रोपासना' प्रत्यक्षात कोठे आहे ? अशा संशयाला जांगा आहे ! बऱ्याच जागी पण सौरबुरख्यात चंद्र दडलेला आहे. देवता उपासना, व्रतवैकल्ये कोणत्या तिथीला करावयाची ? हे ठरविणारे 'पंचांग' चांद्रमान पद्धतीचे आहे ! अधिक मास योजून सौर मानाला जोडून घेण्यात येते ! पाश्चात्यांनी धाडसाने सौरवर्षमान स्वीकारले; तेथील सप्तंबरपासून [(सातवा), आठवा (आक्टोबर), नववा ( नवेंबर ), दहावा ( दशंबर ) ] दिसणाऱ्या क्रमातील हा व्यत्यय, पूर्वीच्या पद्धतीत झालेला फरक लपवू शकत नाही. दशंबर, पण महिना बारावा !

बाराव्या शेवटच्या महिन्यात असणारा 'शिमगा' ( होळी ) पौर्णिमेशी-चंद्राशी निगडित आहे ! ख्रिस्तमास हा शेवटच्या महिन्यात ठेवला गेला आहे ! पूर्वी याला Saturnalia ( शनीचा सण ) म्हणत असत– सण Saturn तत्पूर्वी Cronus ( एकाक्षनागसदृश पक्षी असावा ), हा एकाक्ष सैकोप्लसच्या बंधूवर्गातला दैत्या(टिटान) हा 'काल' वाचक अर्थाशी संबद्ध आहे ! cronus : Saturn शी संबद्ध असणारा हासुद्धा मुळात शिमग्याचाच एक प्रकार असे ! भारतात मरुत = मारुतीचा वार शनिवार मानला जातो !


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

पण शनीदेव कोठून उमटला ? हे स्पष्ट कळत नाही ! 'सूर्याच्या पोटी शनैश्वर' हा वाक्प्रचार 'शनी 'ला सूर्य-पुत्र बनवू पाहात आहे. 'घनश्याम' विष्णु-कृष्णाचा अवतार श्रीरामचंद्र-प्रभू, सूर्यवंशललाम म्हणून कालिदास, वाल्मीकी आदींनी वर्णिले आहे! रामसेवक ( शनी- ) मारुतीच्या संदर्भातील मरुताना वेदांत आदिमानवः म्हटलेले चिंत्य आहे. ( सर्पराज्ञी सूर्यो वा', वेदांतील ही 'वा न वा' ताडून पाहावी ).

सर्प ( अहि ) व भानु ( सूर्य ) या दोन विभिन्न प्रकारच्या दैवतात अ-भिन्नता सुचवण्याचा हा डाव दिसतो! 'वर्षण' क्रियेशी व झंझावाताशी संलग्न स्वरूपात वर्णिले जाणारे हे 'मरुत' ही 'घननील'- श्याम वर्ण ( विष्णु-कृष्णवत् ) असणारच. ग्रीक दैवतकथातील सर्प ( Python ) व वात ( Typho ) यातील अभेदसंबंध चिंत्य आहे. हे 'रुद्रिय', 'माता अदिति-पुत्र' असे स्पष्ट वर्णन ऋग्वेदात आहे. 'रुद्र' हा 'नागभूषण' म्हणवितो! याला 'अ-सुर' मानले आहे; यामुळे अ-सुर रुद्रपुत्र रुद्रिय ही अ-देव = दैत्यच होतात. अहि-भानूंची माता अदिति ही 'नाग' कुलाची माता ठरते. व्होगेल ( Vogel ) हा थोर संशोधक, 'Indian Serpant Lore' या मौलिक ग्रंथात नाग कुलाची माता 'कद्रु' ही 'एकाक्ष' असून, अदितीशी साम्य आहे. असा निष्कर्ष सांगून जातो !

ऋग्वेदांतील आणखी एक कोलांटीची ही विपरीत उडी पाहा: 'माता रुद्राणां, स्वसा आदित्यानां-' अशी ही अदिती-विश्व-जननी- 'एकाक्ष' देवी, यजुर्वेदात, 'विष्णुपत्नी' झालेली दिसते! वेदांत स्पष्ट निर्देश नसला तरी, अहि: नागमाता अदिति, विष्णु-पत्नी ठरत असल्याने हा 'विष्णु' सुद्धा 'एकाक्ष' नागदेवच होत आहे! नारायण = विष्णु = कृष्ण हे समीकरण, हजारो वर्षांपासून शिष्टमान्य आहे. नारायण = नाग = अश्व-त्थ = पुरुष = वृक्ष हे समीकरण भग-वत्-गीतेला अमान्य असणे शक्य नाही. पण वि-चित्र हे की काही संप्रदायात 'नागभूषण' रुद्र हा असुर ओंगळ त्याज्य वाटावा; आणि 'नागशयन' 'विष्णु-कृष्ण-नारायण दैवत पूज्य-आदर्श वाटावे!

वेदकालीन भारतीय दैवतकथेतील वैचारिक व भावनिक आकृतीशी जवळ वाटणाऱ्या कथा ग्रीक प्राचीन परंपरेतही आढळतात! यात काही अर्थ नसेल काय? वागांभृणी व अथेना यातील साम्य तर खरेच; शनी व 'saturn' या नावाने ओळखला जाणारा ग्रह समान का, हे कळत नाही ! 'cronus'

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

हे saturn चे पूर्वीचे नाव; आणि 'क्रोनस' हा 'Titan' दैत्यापैकी मानला जातो. यावरून (शनि = ) मरुत दैत्य ठरतात ! हे 'रुद्रिय' म्हणूनही दैत्य होतात ! प्रथम वेदात देवमाता अदितीचे पुत्र असणारे मरुत; यांचे खरे स्वरूप बाहेर पाडणारी एक कथाही पुराणांतरी दडली आहे. मरुत हे दितीचे पुत्र म्हणून सांगणाऱ्या या कथेप्रमाणेही ही दैत्य संतती ठरते ! नाग-भूषण, नागशयन हे सुद्धा Titan अदेव = दैत्यच ठरत असलेले वर ध्वनित होत आहे. क्रोनस हा टिटान; सैक्लोपस = एकाक्ष पुरुष ! हे सर्व Titan आप: रस पंथीय बंधू, अशी कथा आहे ! यावरून क्रोनस = शनी = मरुत ही 'एकाक्ष' सर्प म्हणून सूचित होत आहे. आप: रसात जन्मलेला एक 'काक' 'बृहंतं वायसं' हाच 'सु-पर्ण'; असे हे एका 'सूर्यपक्षी' म्हणविणाऱ्या 'गरुत्मन्'चे गुपित बाहेर येत आहे ! ही 'एकाक्ष' पुरुष 'नाग' रा--जन् विविध नावे आदि देवाची ( : चंद्र ) असल्याचे, आणखी एका निराळ्या दिशेने उघडकीस येत आहे ! ( नवभारत, एप्रिल, ७२ ).

अशा या आदि नाग=चंद्राच्या आराधनेत 'तल्लीन' होणे; आणि मृत्यूस आ-लिंगन देणे, या दोनी क्रियेत फारसे अंतर नाही, असे 'दिव्याक्ष' सिद्धीचा फ्राइड आजही सांगतो आहे ! मानव जीवनप्रेरणेचा प्राथमिक अर्थ विशद करणाऱ्या या आधुनिक द्रष्ट्याचे हे मत अर्थविहीन नाही; आणि या अर्थाच्या पार्श्वभूमीवरच, या जगात मोक्षवादी संतमहंतांनी प्रवर्तित केलेले हे धर्मसंप्रदाय मृत्युपूजकच का व कसे ? याची खात्री पटणार आहे.

३) या पुरातन 'चांद्र' व 'सौर' संप्रदायातील संघर्षाचा अर्थ काय ?

मानव-जीवनपातळीवर दिसणाऱ्या या संघर्षाचे प्रेरणा केंद्र, अ-मूर्त तात्त्विक पातळीवर दिसेल; ही ओढाताण, वैचारिक स्वरूपी आहे. तात्त्विक पातळीवरील अमूर्त अर्थ : विचार हा दिक्-काल-परिसरातील काही एक घटना, प्रसंग, वस्तु, वा विषय अशा निमित्ताने-वा साहचर्यात-तो विचार मानवाच्या दृष्टिपथात येऊ लागला. पण यातही एक क्रम आहे : व्यवस्था आहे. आणि हा क्रम, ही व्यवस्था ( म्हणजे यातील नियम, पद्धती ) लक्षात घेतल्याशिवाय या अर्थाचे कोडे सुटू शकत नाही.

इतिहासाच्या कक्षेत न येणारी दिक्-काल-परिसरातील कोणतीही गोष्ट, या विश्वात आढळणार नाही. काल-गतीमुळे इतिहास घडतो. भौतविश्वाचा इतिहास, भौत, आप: रस: रेत पातळीवरील ( Biological time )

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

कालाच्या संदर्भातच कळू शकेल. हा मानवगणही भौतपातळीबाहेर नाही; पण हा मानव गण, भौतकालाशिवाय आणखी एक प्रकारच्या कालाचे, पालन करतो. भौतकालगतीशी, (अगदीच) विसंगत नव्हे, अशा स्वरूपाचा, एक प्रकारचा ‘समय’ रूपी काळ (cultural time) या मानव गटा-गटांतून, गणा-गणांतून आचरणात असलेला पाहावयास मिळतो. पण याची जाण, तज्ञ म्हणविणाऱ्या शास्त्रज्ञांनाही, फार अलीकडची आहे ! पण ही ‘जाण’ डोकावून या ‘समय’ रूपी काळाची खात्री पटेपर्यंत– तत्-पूर्वीच खूप उत्खनन–सांस्कृतिक संशोधन लेखन होऊन गेले आहे ! तो अर्थ सदोष असणारा आजसुद्धा या ‘समय’ रूपी कालाच्या रचनेविषयी–आकृति स्वरूपाविषयी पुरेशी खात्री पटल्याचे दिसत नाही ! कारण हा ‘समय’ ‘social contract’ या सदोष संकेतानेच आजही ओळखला जातो ! ‘करार (contract)’ करून, जशी काही, ही कुटुंब संस्था, समाज संस्था अस्तित्वात आली !

मानवेतिहासातील सर्वप्रथम ‘समय’ चंद्राशी संलग्न आहे, हे बऱ्याच नामांकित संशोधकांच्याही लक्षात आलेले दिसत नाही ! कोणत्याही संस्कृतीचा त्या जनगणाच्या भाषेशी जिव्हाळ्याचा संबंध असतो. भाषेशिवाय संस्कृती, पृथ्वीच्या पाठीवर कोठेही आढळली नाही; या उलट संस्कृतीशिवाय भाषा–साहित्य–अस्तित्वात येऊ शकत नाही. सपीर् या संशोधकाचे हे सूत्र बहुमोल आहे. भाषा आणि संस्कृति यांचा समवाय असल्याने, भाषेचा इतिहास शक्य झाल्यास, त्या भाषेत सामावलेला सांस्कृतिक इतिहास प्रकाशात येण्यास आडकाठी नसावी. पण, सांस्कृतिक स्थित्यंतराचा मागोवा घेताना भाषिक शब्द–प्रतिमा व संकेतांचा आढावा घेणे अनिवार्य असूनही, हे टोकेस कारण होत असलेले खोटे नव्हे !

‘समय’ हा त्या संस्कृतीला विशिष्ट आकृति-स्वरूप येण्यास कारण असतो. संस्कृतीची जडण-घडण, ‘समय’ स्वरूपावलंबी आहे ! भाषेला आकार येण्या-तही, समयाचा आकार विशेष दिसेल. तर्क-अनुमानाने हा ‘समय’ जाणण्याचा प्रयत्न व्यर्थ आहे. भौत ‘समय’ = काळ जाणण्याला भौत वस्तु-घटना याचे विश्लेषण अवश्य असते. तसे सांस्कृतिक ‘समय’ जाणण्यास, त्या भाषेतील प्रतिमा : संकेताचे सहाय अनिवार्य आहे, भौतकालाचा भौतपरिसराशी-भूमीशी संबंध येतो. स्थलाच्या अभावी काळ कळू शकत नाही. स्थलकालातील हे साहचर्य अविभाज्य असते. सांस्कृतिक ‘समय’सुद्धा विशिष्ट परिसराशी निबद्ध असलेलाच दिसेल ! हे शब्द-प्रतिमात प्रतिबिंबित असणार.

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

मानव संस्कृतीचा विकासक्रम पाहता, अरण्यात दऱ्याखोऱ्यात दडून जीवन कंठणारे; शिकारीने उपजीविका चालविणारे; पुढे शेळ्या मेंढ्या, गुरेढोरे पालन करून भटकणारे, क्रमाने पट्टी-पाडी- शेती-वाडी माहीत होणारे हे मानव गट; हा असा एक स्थूल आराखडा दिसतो. या वनेचर वृत्तीतील जीवन : संस्कृति साकार करणारा ' समय ' कोणता असेल ? भाषा आणि संस्कृति या दोनीत अतूट संबद्ध असलेले खरे असेल तर, भाषा संकेतातून तत्कालीन ' समय ' जाणता आला पाहिजे. भाषा आणि मानवातील ' उपज्ञा ' ( consciousness ) या दोनीतील संबंध कोणास अमान्य नसावा. मानवाच्या ' उपज्ञा ' प्रज्ञा वाढीचा व संकोचाचा इतिहास आणि त्या जनगणाच्या सांस्कृतिक विकासाचा व विकृतीचा इतिहास, हे दोन्ही समांतर असणार.

मानवाला काल-गतीची सर्वप्रथम ' जाण ' डोकावते, ती ' चंद्रोपस्थानात '. हे या पूर्वी सूचित केले आहे. भारतीय भाषेत ' मास ' महिना याअर्थी कानडीत (तिंगळ् ) असणारा हा संकेत चंद्रसूचक आहे. पाश्चात्य ' Month ' मास याला दुजोरा देत आहे; यांच्या मुळाशी युरो-भारतीय समान आख्यात आहे. इजिप्तच्या पुरातन कालगणनेत पहिल्या महिन्याचे नाव चंद्रवाचक असल्याचे तज्ज्ञ सांगतात. मानवेतिहास प्रारंभ होतो,तो सुमेरभागात. संस्कृति व इतिहासाच्या प्रारंभीच्या परिसराविषयी आज तज्ज्ञ डॉ. फरांकफोर्ट व डॉ. क्रामर सारखे ' हे सुमेरच ' असे निक्षून सांगतात. आणि या सुमेरांत ' चंद्र ' देव (देवी) आराध्यदैवत होते हे सर्वमान्य आहे. इजिप्त संस्कृतीत, एका काळी ( सूर्यापेक्षा ) ' चंद्र ' दैवतच आधी पूज्य व प्रतिष्ठित असावे ( The Intellectual Adventure of Ancient MAN, By Dr. Frankfort & others, p. 47 )

' चंद्र ' दैवत उपासनेमुळे तत्कालीन मानवगटात आकार घेणारा हा ' समय ' व आचार-विचार कोणत्या स्वरूपाचे असतील ? ' समय ' ( सं+अय् ) या संस्कृत सांकेतिक प्रतिमेंत सामावणारा संपूर्ण अर्थ अभ्यसनीय आहे. ' समय ' यांत मिळून जाणे, ( वागणे ), हा ' आचार ' सूचक अर्थही अभिप्रेत आहे. ' अय् ' या गत्यर्थक आख्यातामुळे ( काल ) गती सूचित होते ! ' सं ' या उपसर्गामुळे, ( ' समय ' ( : आचार ) रूपात दृष्टीस पडणारी ) ही काल-गती सामाजिक स्वरूपाची असणार, जैनादींच्या परिभाषेंत ' समया-चार ' हा जोड संकेत रूढ आहे. ' समयास अनुसरून असणारा आचार ' हा धार्मिक-सांस्कृतिक ( सांघिक ) स्वरूपाचाच असतो.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

मानवेतिहासाच्या प्रारंभी ‘ चंद्र ’ दैवत पूजा घेत असेल तर ‘ वनेचर ’ वृत्तीच्या परिसरांतील या चांद्र–समयाचाराचे स्वरूप कसे असेल ? तो समयाचार या अरण्याच्या परिसराशी सुसंगतच असला पाहिजे. सुमेरच्या ‘ पुर ’ संस्कृतीतील इनन्ना (चंद्र) देवीच्या युगप्रतिपदेच्या समयाचाराचे लिखित उल्लेख प्रकाशात आले आहेत. हा ‘ पुरी ’ तला आचारसंप्रदाय; म्हणून वनातील समयाचारापेक्षा अगदीच वेगळा असेल, असा तर्क वाहात असेल तर, तो तर्क सर्वस्वी चुकीचा ठरणार आहे, कारण ‘ काल→आज ’ यातील अविच्छिन्न संबंध विसरू नये. ‘ आज ’ हा कालच्याहून १००% टक्के निराळा नसणार. कालच्यातला काही भाग–अंशतः तगून आज–उद्या यातून पुढे चालत आलेला असतो. यामुळेच तर, कालगतीचा अर्थ– म्हणजे ‘ इतिहास ’ कळणे शक्य होत आहे. ही सुमेरसंस्कृति ‘ पुर ’ संस्कृतीच्या पातळीवर आली तरी, या समयाचारात ‘ वृक्ष ’ पूजा तगून आलेली दिसते ! आणि चंद्रादेवी इनन्नाचा हा ‘ वृक्ष ’ चंद्रवृक्षच म्हणावा लागतो. पण, भारतीय परंपरेत ‘ वट ’ चंद्र वृक्ष असूनही, सवितृ–सावित्रीचा वृक्ष केला गेला आहे ! सुमेर संस्कृतीचा काल क्रि–पूर्व ५००० वर्षापेक्षाही मागे नेणारे आहेत.

सैंधव संस्कृतीत अश्व–त्थ : पिप्पल वृक्षपूजा, फार लोकप्रिय होती. हीसुद्धा ‘ पुर ’ संस्कृतीच होय ! ऋग्वेदात ‘ वृक्षं ’ ‘ वनं ’ दैवतांचा निर्देश येतो ! ( १०·८१ ). शिवाय ‘ अश्वत्थ ’ आणि ‘ पिप्पलांचे वर्णनही येते. उपनिषदे व गीता, या ‘ वृक्षा’चा महिमा सांगतात. आजही भारतात ही अश्वत्थ, वटादि वृक्षपूजा तगून आहे. आजच्यातील संदिग्ध आचारविचार, ज्यांचा अर्थ लागत नाही, अशा गोष्टींची पाळेमुळे ‘ काल’च्या पोटात दूर कोठे तरी आढळतात. या उलट प्राचीन आचार–विचारांच्या वर्णनाच्या संदर्भात ‘ आज ’ मधील गतकालीन अवशिष्टावर प्रकाश लाभत असतो अशा या परस्पर अंतःसंगतीत त्या घटनेची ऐतिहासिक पातळीवरील वास्तवता ध्वनित होत असते. म्हणून ‘ वनं ’- ‘ वृक्षं ’ दैवत निर्देश असणाऱ्या ऋग्वेदातील घटनाचांद्रसमयाचार सूचक असतील तर आश्चर्य वाटू नये.

पाश्चात्य कालमान सौर आहे. या सौर कालमानाचा ख्रिस्ताशी संबंध जोडला गेला आहे ! आणि या ख्रिस्ताचा सातवा ‘ Sabbath ’ दिन, रवि-वार ! तरीपण हा ख्रिस्त काय, हा संप्रदाय ज्या पार्श्वभूमीवर आकार घेतो, तो हिब्रू पंथ काय, हे दोन्ही चांद्र समयाचारातून पोसले गेले आहेत ! यांचा उद्गम सुमेरकडे आहे ! पण या पंथातून चंद्राची उघड पूजा दिसत

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

नसेल; तरी इस्लाम संप्रदायातून पाहावयास मिळते. ख्रिस्ती व हिब्रू या पंथांच्या वैचारिक खत पाण्यात इस्लाम अंकुरला असल्याचे तज्ञ सांगतात. इतिहासज्ञ टाइन् बी म्हणतो हे तीन्ही पंथ 'सहोदर' असून एकमेकाना पाडू पाहतात! इस्लामी निष्ठावंतांचे विशिष्ट महिन्यातील अमावास्येनंतरच्या 'बाल' चंद्राचे दर्शन घेतल्याशिवाय त्यांच्या व्रताचे पारणे फिटत नाही! ज्या सुमेर संस्कृतीतून हे संप्रदाय प्रचलित झाले त्या प्रदेशाला Land of crescent moon असे म्हणण्याची प्रथा आजही आहे.

भाषिक संकेत जिवंत असेपर्यंत स्पष्ट लिहून ठेवला नसला तरी त्यातून संस्कृतीचा इतिहास प्रकाशात येणे अशक्य नाही. भाषा ही मानवाच्या आचार व विचारांच्या पार्श्वभूमीवरच आकार घेत असते. सामाजिक जीवनातील "समया"त त्या भाषिक संकेतांना अर्थ संभवतो. (भाषिक) शब्दरूप बाह्यवलय हे भौतदिक्कालपरिसराशी निगडित असते; आणि या बाह्य वलयात त्या परिसराचे (काही अंशी) प्रति-बिंब पाहावयास मिळत असते. या बाह्य वलयातील भौत आकृती, आणि या शब्द-प्रतिमेतील अर्थ-विचाराची तात्त्विक पातळीवरील अ-मूर्त आकृति या दोनींच्या स्वयंसिद्ध अंतःसंगतीत, त्या विशिष्ट समयाचाराचे स्वरूप (म्हणजे अर्थ=चित्र) मनःचक्षूपुढे आप-सुख उभे राहते (नवभारत जानेवारी, ७२).

चांद्रपूजासंप्रदाय मानवेतिहासाच्या प्रारंभी दिसतो, हे खरे असेल तर, हा संप्रदाय वनेचर वृत्तीतील शेळ्या-मेंढ्या, गुरेढोरे बाळगून उपजीविका चालत असणार. 'अजा'पुत्र बली देण्यात मेंढ्यापेक्षा शेळ्या पूर्वीच्या दिस-तात. ग्रीक दैवत कथात शेळ्याचे कातडे 'दिव्य' यातु सामर्थ्याचे मानले जात असे! गोपालवृत्तीपुढे शेती; येथपर्यंतच्या वाटचालीत अशा जनांचा वनाशी, दऱ्याखोऱ्याशीच-संबंध अटळ आहे. सुमेर, सिंधूतीर येथील 'पुर' संस्कृतीतही 'वृक्ष पूजा होती; तर या 'पुर' संस्कृतीच्या पूर्वीही ही 'वृक्ष' पूजा असणारच. आणि हा 'चांद्र' समयाचारच असला पाहिजे. ऋग्वेदात आढळणारा 'वनं' 'वृक्षं' हा चांद्रसंप्रदायच असल्याचे यापूर्वीच उघड झाले आहे. नवभारत एप्रिल ७२; वगैरे) सुमेरकडील 'वृक्ष' इनन्नादेवीचे वृक्ष पूजा व प्रतिवार्षिक 'युग' प्रतिपदेच्या (बाल चंद्राशी निगडित) सामूहिक आचाराचे वैशिष्ट्य, यांच्या संदर्भात सिंधु तीरावरील व ऋग्वेदकालीन 'चांद्र' समय कसा असेल याचा निश्चित स्वरूपाचा अंदाज घेणे शक्य आहे; याचा हा नमुना पाहा.

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

"Around the end of the third millenarian the city, celebrated yearly the marriage of the Goddess Inanna to the God Dumuzi...in view of the universe as a state- since the Goddess is the incarnation of the fertility nature, and her husband the Shepherd God Dumuzi, incarnates the Creative Power of Spring, it is understandable and this annual union of God and Goddess signifies and is the reawakening of nature in spring. ...

"A priestess, (and King, transcend their human status, take on the identity of the deities Inanna and Dumuzi, and go through their marriage... our text clearly states this, their marriage is the marriage of the Creative Powers of Spring." (Before Philosophy; By Dr. Frankfort and others, p. 214-15).*

सुमेर राजाच्या ' अध्यक्ष'ते खाली हे ' सहयज्ञ ' सार्वजनिक स्वरूपात चालत. ' भग-वंत ', गीतेत सांगतो की : ' सह-यज्ञाः प्रजाः सृष्ट्वा ' ही प्रथा पूर्वी प्रजापतीपासूनच चालत आली आहे ( : पुरोवाच प्रजापतिः ) ! आणि ' मया अधिअक्षेण ' ( : अध्यक्षेण) सूयते स चराचरं ' सृष्टीतील या सृजनास मीच ( : माझा ' अधिअक्ष ' ) कारण आहे ! आणि भगवान् श्रीकृष्ण हा सृष्टि-कर्ता आहे. ' वृक्ष ' रूपही आहे ! या सांप्रदायिक श्रद्धेत, वरील गीतावाक्यांतील गुह्यार्थाचे स्पष्टीकरण मिळत आहे. ' चक्षुः वै सत्यम् ' दिव्यं ददामि ते चक्षुः ' हा एकवचनी दिव्य ' चक्षु ' आणि ' अक्ष ' यांतील गुह्य आकळेल तर ' आनंद ' ब्रह्मज्ञान अशक्य आहे ! गीतेतील हा ' भग-वंत, ', सांगतो ते ( फरांक फोर्ट सांगतो तसे ) हे ' The Creative Powers in Union ' होय. कालिदासाने हेच अत्यंत मार्मिकपणे ( " वागर्थाविव ) संपृक्तौ जगतः पितरौ " म्हटले आहे.

---

* ' तुळसा 'देवी विवाहाची प्रतिवार्षिक चाल, आठवावी: कार्तिक ( रूपी ) राधा, दामोदर ( रूपी ) कृष्णाशी लग्न करते. उपासनी महाराज हे ' अर्पित ' कन्यकांशी याच मुहूर्तावर विवाह करीत. हे प्रकरण, चव्हाट्यावर आले- किर्लोस्कर मासिकामुळे.





राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

सांगावयाचा मुद्दा हा की, भाषिक प्रतिमा जिवंत असेपर्यंत, कोणताही सांस्कृतिक इतिहास संपूर्ण लुप्त होणे शक्य नाही; जरी, कालांतराने– समय परिवर्तनामुळे आक्षेपार्ह कटू लागणाऱ्या अर्थावर– विचारावर, वेलबुट्टीचे श्लेषार्थादि कुसरीचे पांघरूण घातले गेले तरी, वास्तव सत्य; हे उघडकीस येत असते; हे शोधून निश्चित करण्याचे तंत्रही उपलब्ध होण्याची शक्यता दिसत आहे :

मानवातील ही उपज्ञा-प्रज्ञा, वाढीस लागलेली, तसेच संकुचित होत, विकृतीकडे झुकत चाललेली या दोन्ही गोष्टी सुमेर ते वेद व पुढे भग-वत् गीता रचनाकारापर्यंत, वर नमुन्यादाखल थोड्या सांगितल्या. त्या नमूद केलेल्या दाखल्यातून, सुमेरकडील मूळ प्रत्यक्ष आचार व पुढे तोच आचार विरविरीत स्वरूपात, 'सहयज्ञाः प्रजाः सृष्ट्वा', (वागर्थाविव) संपृक्तौ जगतः पितरौ अशा शब्दप्रतिमातून डोकावताना दिसतो ! ऋग्वेदातील 'गर्भं दध्र आपः' (X. ८२) 'चंद्राः आपः' (X. १२२) अशासारखे उघड चित्र नाही, जरी ही गीता, 'भग-वंताची' म्हटले तरी, यातील अर्थ दिसतच नाही असे म्हणता येत नाही. येथील 'गुहानिहितं' निहितं गुहायं' स्वरूपी घटना व अर्थ अगदीच उघड नाही, हे खरे, 'न दिसावे; तरी अगदीच दिसत नाही असे म्हणण्यासही अवकाश नसावा' ही तजवीज गीतेत अथपासून इतिपर्यंत योजनापूर्वक आहे, जसे म्हणण्यास जागा आहे.

पुरातन कालीन चांद्र संप्रदाय जसा होता, त्याच स्वरूपात पुढे का राहिला नाही ? सर्व प्रथम 'काल' गतीची 'जाण' आली, ती चंद्रोपस्थानात. हा सर्वप्रथमचा भौतपातळीवरील काळ (Biosphere) हा 'Organic' काळ, 'Organ = इंद्रियदेवता–अनुष्ठान (अनु-स्थान) 'कर्मदेवानां आनंद' रसास्वादनात, तत् लीनता उपभोगणे हा समयाचार येथे प्रधानच असणार. आ-चार, आणि वि–चार हे दोनी मुळात कृतीशी (चर्) संबद्ध आहेत. आचाराच्या संदर्भात, साहचर्यामुळे दिसू लागणारा त्या पार्श्वभूमीवरील अर्थ : विचार यात त्या आचाराचे स्पष्टीकरण असणारच. या दृष्टीने, वेदांतातील 'प्रकृति' आणि 'पुरुष' (: पुरिशय) हा विचार तपासून पाहावा. 'प्रकृति रूपी पुरीत शयान)' पुरुष हा आदि देव आहे आणि या संपृक्तौ जगतः पितरौ'च्या योगे सृष्टी होते ही शब्दप्रतिमा यातील बाह्य शब्दरूप आकृति भौतपातळीवरील आचाराचे चित्र, तर अर्थ रूपी चित्र तत्त्वज्ञानाचे सार ! हे पुरुष–प्रकृतीचे तत्त्वज्ञान 'पुरातन सनातन आचारा'चे चित्र डोळ्यापुढे उभे करणारे नाही काय ?

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

' एका बीजा ' पोटी कोटी कोटी तरू . . . एकं सत् हे संततत्त्व, दृष्टिपथांत आणणारी ही जीवन रीत, नैतिक बंधनांची ' उपज्ञा ' डोकावण्या पूर्वीची आहे; याला ऋग्वेदात भरपूर पुरावे आढळतात, ' अदिति ' ( : प्रकृति ), ' दक्ष ' ( पुरुष ) यांच्यापासून सृष्टि; म्हणजे ' अदितेः दक्षः अजायत ' किंवा ' दक्षात् अदितिः ' हे दोनी निर्देश वेदात आहेत ( १०·७२ म्हणजे या चालीरीतीत मुलगा, ' मादरचोद ' असणार ! किंवा पिता ( दक्ष ) हा आपल्या कन्येशीच विवाह करणार ! ' उपज्ञा ' विकासक्रमात, हे दोनी प्रकार त्याज्य ठरतात; ' जगत्कर्ता ' ' जनिता ' असा निराळा ' एक देव ' कल्पिला जातो ! या सं–कल्पनेप्रमाणे, पहिली स्त्री व पहिला पुरुष हे सहोदर होतात. आणि आश्चर्य म्हणजे, वेदात शेवटी हा सहोदर संबंध शेवटी येतो ! यम–यमी स्वरूपात दाहाव्या मंडळात येतो. ' यम '–द्वितीयेची चाल, ' अक्षद्यूत ' सभ्यक्रीडा आज दिसते ! ' अंबा रुद्रस्य स्वसा ' ( यजुर्वेद ) अदितिपती विष्णु आदित्यरूपात. आदिती ही विष्णूची स्वसा होते ऋग्वेदाप्रमाणे !

सुमेर संस्कृतीतील प्राथमिक दैवतांत ' तैमत्–किंगु हे नागीण-नाग जोडपे ऋग्वेदातील अदिति–दक्ष यांच्याशी समांतर आहे ! पण दक्षापूर्वी अदितीचा त्वष्टयाशी संबंध सूचित आहे ! तसा सुमेर येथे किंगू हा तैमतशी, ' अप्सु ' मारला गेल्यावर संबंध येतो. किंगु नामक पुत्राशी आई तैमाता विवाह करते ! ' किंगु ' हा ऋग्वेदातील ' दक्ष ' प्रतिमेशी जुळता आहे ! सुमेरकडे ' तैमाता 'ही मारली गेली ! पण अथर्ववेदात भारतीय ' आप ' नाग संप्रदायाने ' तैमाता ' संस्मरणीय ठरवली आहे ! इजिप्तमधील ' इसिस् ' ही अदितीच होय. युरोपातील उल्लेखात हे उघडकीस येते, पण इजिप्तदैवतकथेत इसिस्–ओसिरिस् संबंध सहोदरत्वाचा, शेवटी दिसतो. रुद्राची अदिति; पुढे विष्णुपत्नी होते; तसे, इजिप्तमधे ' सेट् ' हा ओसिरिस- ( होरस् ) चा प्रतिस्पर्धी दिसतो. आर् ग्रेव्हस् या तज्ञाने रुद्र व सेट् या दोघांत साम्य असल्याचे, त्यांच्या गुणविशेषावरून सांगितले आहे !

एकं सत्=एको देवः, या श्रद्धेची वैचारिक आकृति, ' चांद्र ' भूमिकेवरील आचारविचाराशी संलग्न आहे, हे वरील विवरणात उघड आहे. येथे इतिहास आणि तत्त्वज्ञान या दोन्हीत अंतःसंगती आहे. आचारातून इतिहास बनतो; इतिहासात त्या जनगणाचे तत्त्वज्ञान अनुस्यूत असते. तत्त्वज्ञान हे जनगणाच्या आचाराला=इतिहासाला प्रेरक होत असते, ' पाश्चात्य तत्त्वज्ञानाचा इतिहास ' या ग्रंथात, थोर विद्वान ब. रसेल आपल्या ग्रंथाच्या प्रस्तावनेत, हे



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

सूत्र नमूद करतात. विश्वासार्ह तत्त्वज्ञान कोणते ? ज्या तत्त्वप्रणालीला इतिहासात दाखला मिळतो, ते प्रचलित 'ज्ञानमीमांसा ( Epistemology ) संकल्पनाधिष्ठित आहे. यापेक्षा, ज्ञान उपलब्ध होत आलेल्या क्रमाचा मागोवा घेणाऱ्या (socialogy of knowledge व socialogy of culture) दिशेने कळू शकणारे तत्त्वज्ञान, हे जास्त विश्वसनीय ठरणार आहे. तत्त्वज्ञानाचा इतिहास आणि इतिहासाचे तत्त्वज्ञान या दोनीचे उद्‌गमकेंद्र, एकमेकाशी संलग्न आहेत.

वनं–वृक्षं दैवतपूजा,–चांद्र समयाचार– ऐंद्रियिक पातळीवरील भौतकाल ( Biological time ), यातच आपण रहावे अशी योजना, जगावरील सर्वही मोक्षकामी संत-महंत-संप्रदायानी मोठ्या आकर्षक वाटणाऱ्या कथापुराणात व सभ्य वाटणाऱ्या आचारविचारांच्या रूपात आखून ठेवलेली दिसत आहे.

भौत ऐंद्रियिक पातळीवरील हा काळ भौतसृजनाला प्रेरक आहे, हे मान्य केल्यास, "हिरण्यगर्भः समवर्तत अग्रे" ऋग्वेदात निर्दिष्ट असणारा हा आदिदेव 'प्रजापति' चंद्रच असावा लागतो. पण हा सूर्य असावा असा संभ्रम निर्माण करण्याचा प्रयत्नही येथे आहे 'हिरण्य' = सु-वर्ण हा सूर्यं सदृश वर्ण म्हणून मानले जाते. 'सौर' वाटणाऱ्या प्रतिमा मागे लपून हा चांद्र संप्रदाय तगू पाहात आहे. असेही या चांद्र व सौर संकेतातील स्थित्यंतरातून उघडकीस येत आहे.

## ४ ) 'हिंदु' नामक या धर्मात झालेल्या उलटापालटीचे काही मासले

हा प्रकार पाश्चात्य संस्कृतीतही झाला आहे. या संदर्भात त्या संस्कृतीतील प्रतिमा : संकेतांची उलटापालट ही लेखी धरणे, ( जागतिक स्थित्यंतरातला हा प्रकार आहे, हे सूचित करण्याच्या दृष्टीने ) जरूर होत आहे. सौर वर्षमान 'ख्रिस्तिशक' म्हणून प्रचार करण्याने ख्रिस्तपंथ सौर ठरत नाही !

नमुना १. दिव्य वृक्ष=सर्प=सूर्य समग्राच्या संदर्भातच अंश-अंगाचा खरा अर्थ प्रकाशात येऊ शकतो. अभिव्यक्तीचे स्वरूप कळण्याला, त्या मागील काल स्वरूप तपासणे जरूर ठरते. ख्रिस्तमासात उपासनेला 'रात्र' प्रशस्त ठरलेली दिसते ! 'जीवनातील सांस्कृतिक 'सत्य' हे सांकेतिक असते. दिवसाही डोळे मिटून 'अंतरिक्षातील' जनकाची 'देव' म्हणून प्रार्थना चालते. ख्रिस्तमंदिरात मेणबत्ती ( candle ) ज्योतीचे पावित्र्य, महत्व फार दिसते ! भारतीय

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

देवालयातील ‘ गर्भागारात ’ देव असणे, तेथील ‘ नंदा ’दीपाचे स्थान या दोनीतील साम्य वैचारिक पातळीवरही असावे. ख्रिमस् ‘ वृक्ष ’ (मेणबत्तींच्या) दिव्यांचा हा प्रकार भारतीय देवस्थानातील दीपस्तंभाचा आणखी एक पर्याय होय. सुमेरमधील ‘ चंद्रवृक्ष ’ इनन्नादेवीचा आठवावा !

ईव्ह, आदंला ( ज्ञान ) वृक्ष फळ देते ! हे ‘ वृक्ष ’ स्वरूप कळणे सरळ नाही ! पण ‘ वृक्ष ’ कोण आ–नंद फलदायी इव्हच असणार ! हे ‘ फळ ’= वृक्ष, त्याज्य ठरविले जाते ! सर्प आणि वृक्षाचा अभेद संबंध येथे उघडकीस येत आहे. ‘ स्त्री ’ मुळे ‘ पाप ’ संभवले, म्हणून स्त्री, वृक्ष व त्या वृक्षाचे फळ नरकात ढकलणारे मानले गेले. सर्प बहिष्कृत झाला !

पण ख्रिस्त ( = पुरुष ) हाच सर्प असल्याचे वर्णनही आढळते ! “ It should be remembered that this Brazen Serpent in Gospel, According to Johm III, 14 and the apocryphal Epistle of Barnabas XII 7, is a type of Jesus Christ ! ( The White Goddess, By R. Graves, Faber & Faber Ltd. p. 857 )

हा ख्रिस्तीपंथ आधुनिक अस्तित्ववादाचा एक प्रकार असल्याचे डॉ. मर्सिया इलियदे प्रभृति संशोधक विशद करून सांगत आहेत ! ( Images and Symbols, By M. Eliade of Chicago University ). हा अस्तित्ववादही भौतकाल पूजक आहे. म्हणून पुरातन नाग-चंद्रोपासना परंपरेचा हा आधुनिक प्रकार होय. भारतीय अस्तित्व (अस्ति) वाद प्रस्थापक. हा व्यासकृत महाभारतातील तक्षक-वासुकी या नागपरंपरेतलाच असावा, हे निष्कारण म्हणता येईल काय ? ऐंद्रियिक पातळीवरील जीवनाला प्राधान्य देणे म्हणजे ‘ नाग ’ पूजकांचा संप्रदाय; असे आहे हे अभिव्यक्ति-प्रकारात जगावरच साम्य दिसते हे कसे ? ‘ प्र-धान ’ हा संकेत बऱ्याच कालांतराने ‘ सर्वेषु गात्रेषु शिरः ’ या अर्थाचा झालेला दिसेल. अंगना स्त्री म्हणजे ‘ अंग ’ कोणते ?

मानवीय अंतरंगातील प्रामाणिक अनुभूतीच्या अभिव्यक्तीमागील प्रेरणेचे तात्त्विक स्वरूप विषद करताना क्यासिरर् म्हणतात :

Such conceptions are not called out from a reading made world order of Being, to primitive consciousness they present the totality of Being. The mythical








मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

form of conception is not some thing super-added to certain definite elements of empirical existence; instead, the primery "experience" itself is steeped in the imagery of myth and saturated with its atmosphere. Man lives with objects only in sofar as he lives with there forms; he reveals reality to himself and the enveronment enter into this plastic medium, in which the two do not merely make contact but fuse with each other. (Language & Myth p. 9-10; Dover Publication). आणि म्हणूनच—

या 'मौत 'दिव्य' अनुभूतीस कारणरूप 'इंद्रिय' आणि या अनुभूती मागील 'काल'—परिसर या दोनीतील तादात्म्य या ठिकाणी प्रतीतीस येते! रुद्रदेव 'लिंग' रूपीच का दिसला? याचे उत्तर येथे आहे. हा 'भग-वंत' कृष्ण वर्णी देव, मीच सृष्टिकर्ता- व संहारकर्ता (: अमृतं चैव मृत्यु:), (विश्वशक्ती) असल्याचे जाहीर रीतीने सांगत आहे! यात तिलमात्र अतिशयोक्ती नाही! ख्रिस्त वृक्ष = सर्प - दिव्य सूर्य सदृश आहे; तसा कृष्णही वृक्ष = सर्प-सूर्यवत् (आदित्य) रूप आहे!

## नमुना २ : मुनी आणि ऋषींचा

कोणत्याही देशातली, कोणत्याही भाषिकांची, कोणतीही संस्कृति असो; संस्कृतीचे मूलभूत घटक हे' तीन असतील; १) 'समया'ची आकृति, २) सांकेतिक प्रतिमांतून कळू शकते: अशा प्रतिमा : संकेतांच्या तौलनिक समीक्षेत, त्या संकेतात सामावलेल्या 'समया'ची आकृती कळू शकते; याच्या आकृति स्वरूपावरून त्या समयाचे प्रेरक, प्रचोदक, वा संरक्षक असे. ती परंपरा चालवणारे हे कोण? यांचे चित्र डोळ्यापुढे सहजच तरळू लागणे शक्य आहे.

उदा: वनेचर वृत्तींत गुरांच्या कळपात असताना ती 'वनं' 'वृक्षं' स्वरूपी दैवतोपासना- या चांद्र संप्रदायाचे प्रवर्तक कोण असणार? आधुनिक मानवशास्त्राकडून या कोड्याचा उकल होत आहे; अरण्यात वास करणाऱ्या प्राथमिक पातळीवरील प्रत्येक गटाच्या संस्कृतीत त्यांच्या धर्माचा गुरुवर्य एक असतो. याला Shaman (श्रमण), medicine man (बैद्य-वैद) असे म्हणण्याची प्रथा आहे.

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

ऋग्वेदात ऋषी आणि मुनि-यति असे दोन निराळ्या स्वरूपाच्या गुरु-वर्गाचा निर्देश येतो. ऋषि व मुनि (यति) या नावानी सूचित होणारे संप्रदाय मूलतः निराळेच असणार. या दोन्ही वर्गाचा जीवनविषयक दृष्टिकोन पूर्वी कसा असेल हे वेदात निश्चित कळणे अशक्य नाही. गीता सांगते की 'मुनिः मोक्षपरायणः', म्हणजे हा 'मुनि' वर्ग, मोक्षपरायण म्हणजे पारलौकिक सिद्धीकरता जीवन जगणारा असला पाहिजे. गुहेत तपस्येला बसण्याची प्रथा आजही सर्वविदित आहे. एकांत सेवन, अरण्यात-आश्रमात-राहणे हा प्रकार व ही 'चांद्र' समय प्रवर्तक गुरुपरंपरा, मुनिवर्गाचीच असणार; यति, सिद्ध, संन्यासी योगी- अशा विविध संकेतानी सूचित होणारा हा वर्ग, ऐहिक जीवना-विषयी आसक्ती नसणारा, जीवनात 'अर्थ' नाही अशी श्रद्धा बाळगणारा असाच हा असणार.

यामुळे, 'ऋषी' हा जीवनवादी, समाज सं-मुख प्रवृत्तीचा असला पाहिजे; 'जीवेम शरदः शतम्' हा संकल्प कोणाचा असेल? 'अतिदीर्घे जीविते को रमेत'? असा प्रश्न टाकणारा कोण असेल? दुसरा हा जीवनास कंटाळ-लेला असणार, आणि हे वाक्य कठोपनिषदांतील 'कुमाराच्या' तोंडचे आहे! हा 'कुमार' ज्ञानोपदेश-दीक्षेकरता, यमाकडे जातो म्हणे! ही 'मृत्यु' उपासना नव्हे तर काय?

ऋग्वेदांतील मुनि-यतींचे वर्णन अत्यंत संदिग्ध आहे! द्व्यर्थी आहे! तरी स्थूलपणे कळू शकते तेवढ्यावरून सुद्धा, हा 'मुनी' आधुनिकपरिभाषेतील shaman, medicineman सारखा दिसतो, असे कीथ् म्हणतो. (Vedic Index मुनि पाहा) कीथ्चा आणखी एक विचारही येथे नमूद करण्या-सारखा आहे. 'या विरक्तपंथीय गुरुवर्गाचे उल्लेख ३-४ पेक्षा जास्ती नाहीत; एवढ्यावरूनच या वेदात यांचा प्रभाव कमी आहे, अशी समजूत होईल तर ते (सपशेल) चुकीचे ठरेल' या अर्थाचे या विद्वानाचे मत अगदी वस्तुस्थिती-सूचक आहे. ऋग्वेदात मुनि-यति संप्रदायच वर्चस्वी असेल तर, या वेदात ऋषी हतप्रभ असले पाहिजेत; आणि हा वर्ग संदिग्धावस्थेतून नष्ट होण्याच्या वाटेवर असावा. पण याला प्रमाण काय?

ऋषींचे स्वरूप बदलले, हे निदर्शनास आणणारा एक सूचक निर्देश येतो: 'ऋषयः (सप्त) तपसे निषेदुः', एका तज्ञाने वेदात येणारे 'तपस्' या संकेताचे अर्थ निश्चित ठरविण्यासाठीच एक संशोधन करून ग्रंथ लिहिला आहे: मानव जीवनानुभवाच्या संदर्भात सर्वप्रथम मूर्त, भौत रूप आकृतीचा परिचय;


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

या पुढील टप्प्यांत त्या मूर्त–वास्तवाच्या साहचर्यात लक्षात येणारा अमूर्त अर्थ : विचार कळत असतो; ऋग्वेदात तप्, तपस् हे संकेत, स्थूल अर्थाचेच आहेत. उपनिषदांची ग्रंथांतील 'तप करणे' या अमूर्त विचारसूचक अर्थाचे प्रयोग, वरील एका वाक्याशिवाय कोठेही आढळत नाहीत असा त्या संशोधकाचा निष्कर्ष आहे! म्हणून 'तप' करणारे हे मुनी होत, ऋषी नव्हे.

ऋषी हा, जीवनसंमुख प्रवृत्तींचा; 'गुहेत' शिरून तपाचरणात मग्न होणारा नव्हे. पण 'तपसे निषेदुः' ऋषिवर्ग, हा आपल्या ऋषीपणाला मुकला असला पाहिजे ही उघड दिसणारी वस्तुस्थिती ठरते. उपनिषत्काळी तर ऋषी-वर्ग संपूर्ण अस्तंगत होतो, हे सर्वमान्य आहे.

याचा अर्थ : भारतीय पूर्व परंपरेतील ऋषी संप्रदाय नष्ट होतो, आणि मुनींच्या जीवनदृष्टीचा विजय म्हणजे 'मोक्ष' हेच या जीवनातील एकमेव महत्त्वाचे आहे असे ठरणे. व या विचारावर अधिष्ठित आचारविचार अनुसरणीय होणे! ऋग्वेदांतील 'सं गच्छध्वं, सं वदध्वं –' ही नित्य प्रार्थना ग्रंथस्थच राहते. पिंड–ब्रह्मांड ऐक्य = रसो वै सः' या आ–नंद ब्रह्मपदी लीन होणे ही प्रतिष्ठित जीवनरीत ठरते! 'आत्मार्थे पृथिवीं त्यजेत्'! हा व्यक्तिनिष्ठ आत्म-रतीचा मार्ग लोकप्रिय होतो! युरोपातही व्यक्तिवाद बोकाळला. 'Social Contract' मुळे समाज, कुटुंब संस्था शक्य झाली, असे मानणारे महामाग मोक्षमार्गी ख्रिस्तपंथीय दृष्टिकोन रक्तात भिनलेलेच असणार हे उघड आहे. रूसोप्रभृती रोमहर्षण पंथी व्यक्तिवादी होते.

मुनी आणि ऋषी या दोन संकेतानी सूचित होणाऱ्या जीवनरीतीची शिक्षणपद्धतही निराळीच असणार! भारतीय संस्कृतीत, या दोनी दृष्टिकोन-सूचक प्रतिमा : संकेत आढळतात. पण मुनि (यति, सिद्ध, योगी) आणि ऋषि या दोन जीवनरीतीत मूलभूत फरक आहे, याची आज विसर पडलेली आहे! यामुळेच मुनी आणि ऋषि हे दोनी संकेत समानार्थी ठरले गेले. पूर्वी हा जिवंत संप्रदाय होता, याची स्मृतीही नष्ट व्हावी, याचे आश्चर्य वाटण्याचे कारण नाही. विवस्वन् मनु 'स्मृतिकार' हा नारायण–कृष्णाचा 'मानस' पुत्र झाला आहे, हे विसरू नये : महाभारतात, नारायणोपाख्यानात 'मम अष्टप्रकृतयः' म्हणून नारायणानेच सांगितलेल्या यादीत 'सप्तऋषयः' (वसिष्ठः प्र-धान) याच्या समवेत मनूचे नाव येते. भग-वत्गीतेत 'मद्-भावाः मानसा जाताः' या यादीत 'चार मनू जमा आहेत! पूर्वी एकच तर आता चार मनु! 'स्मृती' ची वि-स्मृती होते, तेव्हा पूर्व संप्रदायात गल्लत

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

होणारच. तरी पण ' विस्मृति ' झाल्याची पुनः स्मृती होऊ शकते, ही गल्लत झाल्याची खात्री पटल्यास; म्हणून या सर्व विस्ताराचा हा खटाटोप !

पण मानवी चेतस-प्रज्ञेची (consciousness of consciousness) उलट-सुलट दोन्ही तऱ्हेची ( ambivalent ) अभिव्यक्ति असते, अशी श्रद्धा बाळगणारा संप्रदाय आज प्रबल आहे. या दृष्टिकोनाला ' अमृत ' आणि ' विष ' यांत अंतर दिसणे शक्य नाही !

पण हा नर ( नळ ) प्रज्ञेमुळे मानव होतो हे त्याच्यातील ' विवेका ' मुळे ना ? चांगले व वाईट या दोनीत, वाईट शक्यतो दूर सारून, चांगले जवळ करण्याच्या अंतःप्रवृत्तीमुळे हे शक्य होत आले आहे. ही ' विवेकशक्ती '– वेचून घेण्याकडील कल हा मानवात अभिजात मानणे भाग आहे,–कारण, आपःस्तः रेत पातळीवरील ( Biosphere ) पशुपक्ष्यांलही आपणास पोषक आहार कोणता, हे वेचून घेण्याची शक्ती आहे. हे खरे असेल तर, ' अमृतं चैव-मृत्युः 'च हा ambivalent दृष्टिकोन श्रद्धास्वरूपात स्वीकारणारा हा मनु-आपल्या विवेकालाच तिलांजली देत आहे, हे खोटे का ?

रात्र = दिवस ( अहश्च कृष्णं, अहःअर्जुनं, च ), सुख = दुःख जीवन = मृत्यु , सुवर्ण = लोष्ट-अश्म ही ' समत्वा 'ची योगी दृष्टी मुनि-संप्रदायाची असे भग-वंतप्रणीत गीतेवरून कळते ! म्हणून वर सूचित केलेली चांगले आणि वाईट यांची निवड करण्याचा प्रामाणिक प्रयत्न टाकावयाचा का ? ही विमर्शनात्मक दृष्टी ऋषीची असे म्हणावे लागते. पण गीतेप्रमाणेच ऋग्वेदातही विचारांची गल्लत व विकृती आलेली दिसते. असे कांही नमुने प्राज्ञांच्या परिशीलनार्थ येथे देणे युक्त दिसते. हे दोनी दृष्टिकोन एकच नव्हेना ? खालील विचारांत एक मुनी–यति संप्रदायाशी सुसंगत प्रकार तर दुसरा ऋषि प्रणीत जीवनरीतीशी सुसंबद्ध दिसतो, हे खरे ना ? कृपया तपासून पाहावे :

## (५) आपल्या संस्कृतीतील वैचारिक गल्लतीचे काही नमुने

१) अ. 'गुरु वाक्य ' हेच प्रमाणः ' गुरुः ब्रह्मा गुरुः विष्णु गुरुः देवः महे-श्वरः '

१. ब ऋग्वेदांत विमर्शक दृष्टि सूक्त आहे (१०.७१). सातू पाखडून शुद्ध करून घेतात, तसे ' भाषा ' निदर्शक दृष्टीने पवित्र करून वापरतात. ही भाषा त्या व्यक्तीच्या भाग्यास कारण होते.

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

२. 'शिष्यात इच्छेत् पराजयम्'. 'यदि ते कर्मविचिकित्सा वा वृत्तविचिकित्सा वा स्यात्। अशा संशयाच्या वेळी 'ये संर्मशिनः। युक्ताः' आहेत, त्याना आदर्श मानून ते जसे वागतात, जगतात तसे तू वाग (तै. उ. १.११).

अ. भगवंत सांगतो: 'माझ्या ध्यानधारणेत सर्वस्वी-रत हो: म्हणजे तू माझ्यातच येशील' (मय्येव मन आधत्स्व...) यांत बिलकूल शंका नाही (अत ऊर्ध्वं न संशयः) गी. XII. ८.

नाहीतर-संशय येईल तर–सर्वस्वाचा घात होईल.

–संशयात्मा विनश्यति।

– तस्मात् (गुरुं) शरणं गच्छ सर्वभावेन। XVIII. ६२.

ब. एतत् विमृश्य अशेषण यथेच्छसि तथा कुरु XVIII. ६३.

(या पुढे ६६ श्लोक पाहा: सर्व धर्मान् परित्यज्य माम् एकं शरणं व्रज! 'यथेच्छसि तथा कुरु' चे निर्णयस्वातंत्र्य काय राहिले – शरणागतीत ?)

२) अ. ऋग्वेदांत अग्नीचे दोन प्रकार आहेत: एक, आप स्वरूप अग्नी, की जो वृक्षांत, व्यक्तींत सर्वत्र सूक्ष्मरूपात आहे; आणि भौत-सृजन-क्रियाप्रेरक आहे. (१०.५१) आपातील हा अग्नी 'अपांनपात्' म्हणवितो; हा अग्नी 'चांद्र' अग्नी, 'गौतमाग्नी' या नावाने ओळखला जातो. तरुण-तरुणींतील या अग्नीचे वर्णन उपनिषदात येते:

पुरुषो वाव गौतमाग्निः; योषा वाव गौतमाग्निः

(छां. ५, ७, ८. बृ. ३, १२, १३.);

ब. ऋग्वेदांत जात-वेद नामक अग्नीही एक आहे. प्राण्यांच्या देहातील (आप: रस: रेत: शुक्ररूपी) अग्नी, न-चिकेत, अ-बोधी अशा संकेतानी सूचित आहे.

अर्थात् या अग्निभेदावरून वेदकालीन 'यज्ञ'क्रियासुद्धा उभयविध असणार.

अ) 'गर्भ दध्र आपः' हे 'यज्ञ' फल अबोधि, नचिकेत अग्नीच्या कृपेचे फळ असणार. 'योषा' व 'पुरुष' यांच्यासंबंधातच हा 'यज्ञ' संभवणार. विश्वकर्मा सूक्ते (X. १; २) व हिरण्यगर्भ दैवत सूक्त (X.१२१) यातील 'यज्ञा'चा हा नवा प्रकार दिसतो!

('पुरि-शय' =) पुरुषसूक्तांत येणारे 'यज्ञा'चे वर्णन याच प्रकारचे असले पाहिजे: 'यज्ञेन यज्ञं अयजंत देवाः; तानि धर्माणि प्रथमानि आसन्। हा प्रपंचातला सर्वप्रथम (प्राथमिक)–धर्म– सनातन धर्म होय; आप: रस पातळी–

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

वरील हा आदि ' यज्ञ ' च श्रेष्ठ ठरतो; तेव्हा ' यज्ञ ' संकेतातील मूलार्थ संपूर्ण वेगळा होतो. हा ' न-चिकेत ' यज्ञ, ' जातवेद ' (अग्नी) यज्ञाला मागे टाकतो ! आणि ' जातवेद ' अग्नीचे विडंबन केनोपनिषदांत वाचायला मिळते ! तपासून पहा.

हा ' रात्री'यज्ञ मूलतः ! हा ' यज्ञ '; ब्रह्मचर्याशी समान आहे. यत् यज्ञः इत्याक्षते, ब्रह्मचर्यमेव तत् ! (' छां, ८.६.१ )

या ' यज्ञ 'विवरणांत यज्ञ = ब्रह्मचर्य ही एक नवी गोष्ट बाहेर येत आहे ! या ' ब्रह्म-चर्या 'चे स्पष्टीकरण मिळेल तर या यज्ञाचे स्वरूप कळणे शक्य आहे.

प्रश्नोपनिषदांतील हे स्पष्टीकरण पहा :

' ब्रह्मचर्यं एव तत्, ( यत् ) रात्रौ रत्या संयुज्यन्ते ( १.१३ )

अशा प्रकारे मूळ ' यज्ञ ' स्वरूपच वेगळे–आगळे झाल्यावर, ही ' यज्ञ ' व्याख्याही निराळी झाली पाहिजे; 'समय-परिसराच्या आवरणांतच अर्थ कळू शकतो. पूर्वीचा ' समय ' ( cultural time ) परिसर ( space ) बदलतो; त्या बरोबर त्या संकेतांचा अर्थही निराळा होतो. " सः यत् जायते तस्मात् यञ्जः; यञ्जोह वै नाम एतत् यज्ञ इति । श. ब्रा. ३, ९, , २३.

मोनियर विलियम्स् कोश हा बदल नमूद करतो. ' यञ्ज् ' a word, invented to explain ' यज्ञ ' अशा निरुक्ताना 'folk' किंवा popular etymology' असे स्थूलपणे सांगितले जाते ! पण यामुळे या नव्या निरुक्ताच्या निमित्ताने, दृष्टीपुढे येऊ शकणाऱ्या तत्कालीन जीवन स्वरूपच, सूचकअंशासच आपण मुकत आलो आहोत ! ' यज्ञा'च्या आचरणांत झालेली ही उलटापालट सांस्कृतिक सं-क्रांतीची बालके यांचे-चित्र आहे. ग्रीक संस्कृतीतही निरग्नियज्ञ ( Fireless Sacrifice ) प्रचलित होता ! पायथा गोरासला हा यज्ञप्रकार मान्य होता. ( " Prolegomena to the study of Greek Religion, " By Jane Harrison; p. 93 ) आणि, या काळी नागः वृक्षपूजा प्रचलित होती, या ग्रंथात, दाढीचा ( Bearded ) नाग ( चित्र ) पाहावयास मिळेल ( p.20. Fig. 4 ) वेदांत हिरण्यकेशी, श्रृंगीनाग, एकाक्ष नाग आहेत; पण चित्रे दुर्मिळ;.

ब) यज <यज्ञ हा मूळ संकेतार्थ; आपः रस संप्रदायी निरग्नीच्या संदर्भात यञ्ज यज्ञ होतो, हे निश्चित आहे. पण, प्रचलित ऋग्वेद संहितेत, ' जातवेद अग्नि'

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

संप्रदायाचा ‘यज्ञ’ आढळेल असे वाटत नाही ! कारण आप: सलिलस्वरूपी ‘ऋतावरी’ अदिती लोकमाता सर्वही मंडळांत पूजा घेत असलेली दिसेल. दुसरे व तिसरे ही प्राचीन मंडळे, असे मानले जाते. पण या मंडळांतच अग्नीला ‘अदिति’ व ‘अत्रि’ अशी दोन्ही विशेषणे आहेत (II. १.११ ). तू ‘आदित्य’ आहेस ! ( I.१.१३ ); म्हणजे हा अग्नी ‘पाण्यांतला, चंद्रातला ठरतो !’

यामुळे, ‘जातवेद अग्नी’ संप्रदायाचे मूळ रूप कळणे दुष्कर आहे. यज्ञाच्या ( सांकेतिक, प्रत्यक्ष अग्नीच्या निमित्ताने पूर्वी होत असलेला ) कांही एक प्रकार प्रचलित असावा असे म्हणता येते. कारण ज्ञात स्थूल मूर्त स्वरूपाच्या कृतीच्या संदर्भात, त्यातून पुढे, सांकेतिक अर्थ तरळू लागतो. हा क्रम, ‘अग्नी’ या शब्द-प्रतिमेमुळे निश्चित दिसतो: ‘पाण्यांत अग्नी आहे’ ही कल्पना मूळ स्थूल-अग्नीच्यामुळेच डोकावली ’ असणार.

शिवाय, ज्ञात मानदंडाच्या अनुरोधाने, नव्याने प्रचारात येणाऱ्या गोष्टीना नाव दिले जात असते. ‘न’-चिकेत अग्नी, ‘अ’बोधि अग्नी, ही पाण्यांतील (वृक्षा-तील ‘अ-दिति’ रूप अखंडित) अग्नीची नावे ‘जातवेद’ या नावाच्या संदर्भात मुद्दाम प्रचलित केली गेलेली वाटतात. या पाण्यातील यज्ञांचे ‘यञ्ज’ <यज्ञ हे रूप प्रत्यक्ष अग्नियुक्त मूळ ‘यज्ञा’हून निराळे आहे, यात मतभेदाला जागा नाही.

३) आता उलथा पालथीचा हा तिसरा नमुना ‘जातवेद अग्नी’ आणि मूळ ‘यज्ञ’प्रकारात झालेल्या विकृतीची हा नमुना खात्री पटवील. असे म्हणावयास जागा आहे. ऋत: सत्य या प्रतिमांतील मूळ अर्थ: विचार ( : चित्र Concept) उलटा झालेला या वेदांत सर्वत्रही दिसेल. वरुण दैवताच्या आणि अदितीच्या संदर्भात हे उघड होते आहे.

ऋत (: सत्य ) ही शब्दप्रतिमा, अवेस्तातही ‘अष्’ या रूपांत आहे. ऋग्वेदात ऋत: सत्य वरुणाशी संबद्ध आहे, तर तेथे अहुर-मझ्द दैवताशी संबंध आहे. अहुर-मझ्द हा ‘प्रकाश’रूप आहे. एकाकाळी ‘मित्र (सूर्य) देवता मित्र ‘वरुण’ आणि अहुर-मझ्द यांत मूळ ( एकेवेळी ) साम्य असावे असे कांही विद्वानांचे मत आहे. भारतात ( आल्यावर ) वरुण हा आप: रसाधिपती ( चंद्रस्वरूप ) होतो, हे सर्वमान्य आहे. पण अहुर-मझ्द प्रकाशरूपच राहि-ल्याने, त्या संप्रदायातील अष (: सत्य ) हे आप: रस स्वरूप झाले नाही. पण मूळ ‘ऋत (: सत्य ) हा विचार अहुर-मझ्दप्रमाणे वरुणाशी संलग्न असल्याने, ‘वरुण’ हा हे सुद्धा आप: रस: रेत स्वरूपी होणे अटळ ठरले ! म्हणून

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

'सत्य (: ऋत) मेव जयति' या वेदोपनिषद् वाक्याचा अर्थ काय ? आपःरसः-रेत स्वरूप सत्याचा जय होतो ! हा अर्थच अभिप्रेत नाही, म्हणता येत नाही !

म्हणजे ऋत : सत्य हे मुळात 'प्रकाश'तत्व पूजकाचे; 'जातवेद' अग्नी-रूप सोमपंथीय याजकांचे होते. पण पुढे 'समय' बदलतो; संकेत : प्रतिमात स्थित्यंतर होऊन 'नव्या' समयाचाराशी सुसंगत होणे ही क्रमप्राप्त अनि-वार्य घटना होते ! या नव्या ( पण दबलेल्या, तत्पूर्वीच्या ) संप्रदायाचे नेतृत्व कोणाकडे असेल, हे सांगणेही येथे शक्य आहे हा नेतारवर्ग ( Elite ) मुनी पंथीच असणार. प्रथम १) सांकेतिक प्रतिमा कळतील तर त्यांच्या बाह्य भौत आकृतीवरून आणि आंतरिक अर्थ : विचाराच्या आकृती-वरून, या 'प्रतिमा' मागील २) समय : परिसर कोणता, याची जाण येऊ शकते; व ३) या दोनीच्या अंतःसंगतीत या प्रतिमांचे प्रेरक, प्रचारक कोण ( elite ) हे ( ते वेदकालीन असोत वा वेदपूर्वकालीन असोत ) उजेडात येऊ शकते. सम सामायिक प्रतिमा : संकेतातील अंतःसंगतीत, या तीनी गोष्टी साहचर्यामुळे एकत्र आढळतात ! वरुणपुत्र हा उर्वशी : अप्-सरा पोटी जन्मलेला ( : आपोवत्सः ) 'वसिष्ठ' हाच या संप्रदायाचा प्रणेता- पुनरुद्धारक असल्याचे निश्चित ठरत आहे. ( नवभारत मार्च, व आक्टोबर ७३ ). भारतीय संस्कृतीत पुरातन झालेल्या स्थित्यंतरात, संभवलेल्या 'सं-क्रांती' ची ही अशी कथा आहे. या कथेला समांतर घटना ग्रीस वगैरे संस्कृतींच्या स्थित्यंतरातही आढळतात.

हजारो वर्षापूर्वी झालेल्या उलटापालटीच्या या निष्कर्षाचे, आज या प्र-गत विसाव्या शतकात, प्रयोजन काय ? 'चंद्र' 'सूर्य' अशा या प्रतिमा, जुनाट व बुरसटलेल्या- विचारांचे माध्यम असणार ! पण –

५) जीवनप्रेरक वैचारिक आ-कृती या सार्वकालिक आहेत; सनातन (perennial) आहेत. भाषिक संकेत इतिहासाच्या कक्षेत येतात. इतिहास आणि तत्त्वज्ञान या दोनीतील अंतःसंगती असते; आणि यामुळेच, मानवाला 'स्व'–स्वरूप ज्ञान शक्य होत आहे; या ( ज्ञानाला ) कला–साहित्या– कडूनही मदत मिळते. पण 'कलेकरता कला', हे भयावह आहे, हे एकं : सत् तत्त्व वेदोपनिषदातील 'सर्प = देवयजन' विद्येशी निगडित आहे ! आणि, ही नाग : चंद्राविद्या जीवप्रेरक म्हणून तशीच मारकही पण असल्याचे सिद्ध झाले आहे ! 'कलेकरता कला' मृत्युपूजेकडेही झुकू लागण्याची शक्यता वारंवार डोकावत असणार, यावर एकच उपाय : सामाजिक प्रज्ञाजीवन जागृत असणे; ही प्रज्ञा

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

तगण्याच्या दृष्टीने, मानवजीवनप्रेरक मूलभूत आकृति स्वरूपाची चर्चा, ही केव्हाही प्रयोजनकारीच होय.

चंद्र–सूर्य–नक्षत्रादि माध्यमाद्वारे व्यक्त झालेला 'आशय' हा, जुनाट–बुरसटलेला; असा ग्रह, पूर्वी इतका आज तीव्र स्वरूपात राहिला नाही. डॉ. ज्यूलियन् हक्स्ले सारखे ख्यातनाम भौतशास्त्रज्ञही, नावे ठेवीतच, यात खूप खोल तथ्यांश असल्याची कबूली देत आहेत: या Myths ... "are so profound in their intuition that they can continue to serve a valuable function long after their literal truth has been discarded." ( New Bottles for New Wine; Harper & Bross. N. Y. p. 18 ).

मानव जीवनातील हे 'सत्य' दोन पातळीवर प्रतीतीस येत असल्याचे, ऋग्वेदांतील i ) 'चंद्र' व ii ) 'सूर्य' या सांकेतिक माध्यमाच्या द्वारे सूचित होत आहे. पण, या दोन पातळ्या, शेवटी जाणिवेच्या-ज्ञानाच्या स्वरूपात एकमेकाना आधारभूत एकात्मक दिसतात: भौत विशिष्ट स्वरूप चांद्रसत्य हे, सामान्य– समान धारणारूप सौरप्रकाशाच्या योगेच अर्थाच्या कक्षेत येते; कारण, मूळ चांद्र: भौत विशिष्ट हे अंधार होय. प्रचलित पाठांत दृग्गोचर होत असणाऱ्या उलथापालथीत चंद्र = सूर्य ठरविण्याचा अट्टहास उघडकीस येत आहे. उदा: 'सर्पराज्ञी ( : चंद्र) सूर्योवा'. (नवभारत नोव्हें. ७२; व सप्टेंबर ७३) 'चंद्र' हा, भौतकाल ( Biological Time ) प्रेरक आप : रस : रेत पातळीवरील ऐंद्रियिक ( organic ) काल होय. हे यापूर्वीच्या विवरणात आले आहे. हा चांद्र 'समय', सर्प, 'वृक्ष' ( पक्षी : उदा-सुपर्ण = वायस सुद्धा ) अशा विविध माध्यमांच्या द्वारे व्यक्त झालेला दिसेल; वेदातच नव्हे, तर सुमेर, इजिप्त, ग्रीस वगैरे संस्कृतीतील दिव्य दैवत कथातूनही.

समय–परिसरास अनुसरून माध्यमाची दिक्-काल-बद्ध भौत- बाह्य आ-कृति- स्वरूप बदलत असते; पण आंतरिक तात्त्विक स्वरूपाची अर्थ: भाव– विचार रूप आकृति ही सार्वकालिक असून, सांस्कृतिक समय–परिसराप्रमाणे वेळोवेळी माध्यमाची आकृती बदलते म्हणून निराळ्या माध्यमाच्या आश्रयाने तो 'आशय' आविष्कृत होत असतो. म्हणून विचार हा सनातन ( perennial ) स्वरूपाचा म्हणावा लागतो. पाश्चात्य विद्वानांच्या 'History repeats itself' या वाक्यांतील 'आशय' हा सार्वकालिक सत्यसूचक आहे; जरी या अभिव्यक्तीची बाह्य आ-कृती सदोष असली तरी!

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

वरील वाक्यांतील ' इतिहास ( History ) ' हा संकेत, संदिग्ध आहे; ' इतिहास संकेत भौत मूर्त घटनाना लागू पडतो. दिक्-काल परिसरातील काल–गतीशी, ' इतिहास ' ( इति ह आस म्हणजे ' हे असे होते ' ) हा संकेत सुसंगत असतो; पण पुनः पुनः मनःचक्षूंपुढे ' repeat ' होणारी गोष्ट, इतिहासातील भौत– बाह्य घटना नव्हे; तर त्या घटनाप्रेरक वैचारिक सांकेतिक आकृतीही पुनः पूर्वीचीच असल्याचे दिसत असते.

महात्मा गांधीजींना जिवंतपणीच पाश्चात्य होल्म्स सारखे धार्मिक दृष्टीचे विचारवंत, त्यांना ख्रिस्ताचा पुनरावतार असे मानीत असत; पुढे ख्रिस्ताप्रमाणेच त्यांचा अंतही व्हावा या घटनेत ' इतिहासाच्या पुनरावृत्ती 'ची खात्री पटते; पण भौतपातळीवरील मूर्त घटनेत नव्हे ! तात्त्विक पातळीवरील समान आकृतीमुळे ! चांद्र– सत्य उपासक ख्रिस्त, फासाला (क्रूस) कवटाळतो; तशीच ' गती ' गांधीजींची होते; हे महात्मा देव = सत्य; सत्य = देव मानणारे; नैष्ठिक ब्रह्मचर्य प्रतिपादक होते. वरील उदाहरणात सुव्यक्त असणारी एक तात्त्विक गोष्टही अभ्यसनीय आहे. ती ' एकं एव ( अद्वितीयम् ) स्वरूपी सत्याच्या स्वरूपी सत्याच्या आकृतीची.

१ ) या एकं सत्याची लक्षणे व रचना वैशिष्ठ्य

एकं सत् : One without second या अभिनिवेशाचे हे प्रेरणाकेंद्र, पुरातनकाळी ' चांद्र'सत्य या नावाने ओळखले जात असे. ' आपः भूयिष्ठः इति एकः; ' अग्निः भूयिष्ठः ' इति अन्यः – – ( I १६१.९ ); ' चमस -पात्र' रसा-स्वादाच्या पार्श्वभूमीवरील ' एकं सत्'चा हा वाद ग्रीसकडेही दिसतो. याच तोंडावळ्याचा ' आर्फिक् ' पंथ तेथे होता. थ्यालेस्च्या मते ' आप ' हेच विश्वाचे मूल तत्त्व; पण हिराक्लिटस् मानतो की ' अग्नी '. विश्वजनक तत्त्व आहे ... हा विचार Being : Becoming स्वरूपातही ग्रीसकडे होता. आणि आश्चर्याची गोष्ट म्हणजे ऋग्वेदांतील न- असत् पंथीय ( : नासदीय ) सूक्तांत हाच विचार ' आ- भु ' या माध्यमप्रतिमेत प्रतिबिंबित झालेला दिसेल (X. १२९ ). भू> भव् : सं-भवाशी संबद्ध ' आ-भु,' Being, Becoming हे दोनी अर्थ एकाच वेळी सुचवीत आहे ! आणि हे ' Essence, ' ' रस ' स्वरूपी तत्त्व मूर्तामूर्त रूपांत उभय पातळीवर दिसू शकणारे आहे !

प्र-लय ( अमावास्या ) झाल्यानंतर पुनर्-उत्थापन (Resurrection) – सृजनसूचक विचार बालचंद्राच्या संदर्भात सुचला. आणि या ' एकं-सत् '

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

सत्याची प्रतीती येथेच आल्याचे उघड होत आहे. जनन- मरण हे चक्राकार गतीचे; याचा मान-दंड हा अमावास्या आणि पौर्णिमा या घटनाशी बद्ध; आणि याला 'चंद्र' हाच कारण असणार; व आहे–; हे पुरातन उल्लेखावरूनही दृढ होत आहे. चंद्रोपस्थानांला प्रेरक हा आप : रस : रेतपातळी वरील मूर्त रूप भौत काल – ऐंद्रियिक अनुभूतिदायक ( Biological – Organic flux रूपी ) काल आहे.

या कालानुभूतीत 'मृत्यूतून जीवनस्रोत निघतो' अशा संभ्रमाला जागा आहे : युग प्रति–पदा, ( पुन: पाऊल टाकणारी ) Saturnalia : शिमगा : होळीच्या अमावास्येनंतर उगवणाऱ्या बालचंद्र दर्शनाशी निगडित आहे ! पाश्चात्य कालमान, दिशा या सौर; पण आधार संप्रदाय चांद्रच ! १२ वा महिना : 'फाल्गुण' ! Saturnalia सोडला तरी 'चंद्र वृक्ष': खिस्त या कारण वृक्षाची पुसट स्मृती सौरमानाशी जुळती केली ! युगचक्राची संकल्पना (आत्यंतिक) प्र–लयाशी संलग्न आहे. ( Myth of Eternal Return, M. Eliade यांच्या उद्बोधक ग्रंथात वरील तत्त्वाचे विवेचन आढळेल ). पण अमावास्या ही 'Phenomena' आहे ! रात्रदेवी सूर्याला जन्म देते; अंधार प्रकाशाशी संलग्न दिसतो म्हणून अंधारच प्रकाशाला जन्म देतो असे म्हणता येईल काय ? सर्वप्रथम चंद्रोपस्थानात 'तत्' रूप होण्यात प्रतीतीस आलेले हे 'एकं' स्वरूपी सत्य 'विशिष्ट' अनुभूतीशी निगडित आहे. 'एकं' ( सत्याच्या ) या भूमिकेवर 'विशिष्ट' हेच आत्यंतिक सत्य असे वाटत असणार; हे अ–स्वाभाविक म्हणता येत नाही ! पण 'विशिष्टा'ची आसक्ती तदितर सर्वही अर्थविहीन; व्यर्थ मानण्यास भाग पाडते !

विशिष्टात्मक अनुभूतीच्या 'एकं सत्' या तात्त्विक भूमिकेचा भौतांशी अतूट संबंध असणे अनिवार्य असते; याशिवाय आणखीही एक वैशिष्ट्य येथे विचारार्ह आहे. हे 'एकं' अ–खंडित, अतूट राहू इच्छिते; पुरातन परिभाषेत 'अ–दिति' स्वरूपात हे पूजिले जात असे. ऋग्वेदाच्या प्रचलित पाठात दहाही मंडळात येणारी 'अदिति' लोकमाता अखंडित स्वरूपी ( Undifferentiated whole आहे. हे 'विशिष्ट' एकं : सत् 'अखंडित' असते, म्हणजे Logical continuum स्वरूपी असते !

म्हणजे, हा भौतमूर्तकाल, परिसराशी ( = भूमीशी ) बिलगून सरपटत जात असतो. भूमी ( space ) पासून हा भौतकाल विलग्न होऊ शकत नाही. सृजनाच्या संदर्भात 'स्थल' ( space = भूमी ) स्त्री रूपी, तर 'काल'

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

हा ' पुरुष ' ( पुरिशय ) ठरतो ! पण या भूमिकेवर, गती=भूमी म्हटल्यास काल-पुरुष हा भूमिपुत्र ठरतो. ग्रीक दैवतकथेत भूमि ( Gaca ) पुत्र Titana म्हणवितात ! भौमा (>भूमी) सुर हे नाव Titana याशी संपूर्ण जुळते.

' भूगोल (Geography) ' इतिहासा'ला जन्म देतो ! हा टिटानांचा इतिहास ठरणार ! आर्. ग्रेव्हस् सांगतो की Uranus-Ournus हा वरुणाशी वृत्राशी जुळता देव आहे. दुसऱ्या तज्ञांचे ( E. O, gemes, Anciena Gods ) मतही असेच आहे. Urenus = Urdeus ( viper ) यांतील अंतःसंबंध सुचवून युरेनस् ' चंद्र ' रूप ठरविला गेला आहे, वरुणाप्रमाणे ! ही चांद्र दैवते, Titan=असुर, भौम, दैत्य म्हणून एका संप्रदायाने पुरातन काळी ठरविल्याचा हा पुरावा, आज लपविला जात आहे ! अवेस्ता ग्रंथातही या घटनेला पुष्टी मिळते; ऋग्वेदातील ' देव ' हे अवेस्ताच्या दृष्टीने अदेव ( Demon ) = Daeva आहेत !

याची किंचित कारणमीमांसा फरान्सचे संशोधक रेनु सांगतात ( नवभारत, ७३ सप्टेंबर, पान ११-२ ). ' अमृतं चैव मृत्युः ' चांगले आणि वाईट हे न निवडता ' अखंडित ' स्वरूपातील प्रेरणेस कारण कारण असणाऱ्या कालाची ही ऐंद्रियक पातळीवरील संतती ही, दैत्य स्वरूपी होणारच, अवेस्ता परंपरेतही दोन प्रकारचे ' काल ' आहेत असे संशोधकानी सप्रमाण दाखविले आहे.

( 1 Symbols & Values in Zorostrianism, p. 44-45 and 2 and, History, Time & Deity by S. G. F. Brandon. 1565, p. 40-41 )

या दुसऱ्या ग्रंथात कृष्णकाळ-सर्पाच्या वेटोळ्यातली प्रतिमा, उग्र उभी रूपांतली युरोपांत ' मिथ्र ' संप्रदायाशी संबद्ध मूर्ती छापलेली पहावयास मिळते.

अवेस्तापरंपरेत, या पार्श्वभूमीवर ' प्रकाश ' रूपकालगती अहुर्मज्द अंधाररूप कालगती अहिमन् आहे. आणि हा सर्प-चंद्ररूप ठरत आहे ! ऋग्वेदांतही अहिमन् सदृश, अर्यमन् आहे ! अवेस्तांत, वरुणसदृश अहुरमज्द ( : प्रकाशरूप ) हा अहिमन् ( : सर्प=चंद्र ) या दैवताला दूर ठेवतो; पण ऋग्वेदांत वरुण व अर्यमन हे देव समान पातळीवर दिसतात. म्हणूनच अवेस्ताच्या दृष्टीला ' देव ' हा संकेत ऐंद्रियिक पातळीवरील गुणद्वंद्व ( ambivalent ) शक्तिसूचक प्रतीक दिसला, हे अत्यंत समर्पक आहे.

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

या दृष्टीने, प्रचलित सर्वही मोक्षमार्गी संप्रदाय, अमृतं चैव मृत्युः ' या उभयस्वरूपी दैवताराधक आहेत; म्हणजे सुष्ट-दुष्ट उभयस्वरूपी शक्तींना देव म्हटले तरी, ही, खरोखर दैत्य=असूर=टिटान आराधना आहे. नार-अयन =' नारायण ', नार-क ( अथर्ववेद ) या दैवत प्रतिमेत असणारे समान ' नार ' पण हा आसुरीप्रकार लपवूनही लपणे शक्य नाही-उप-ज्ञा=प्रज्ञा सूर्य ( :सवितृ ) हा अरुणोदयाच्या संदर्भातच ' राहु ( =सर्प=चंद्र ) ग्रस्त होता, आज ' सूर्य-नारायण=नाग ' आराधना म्हणजे ही सांकेतिकता सूर्य-ग्रहण सूचकच नव्हे काय ? ऋग्वेदांतील ' सर्पराज्ञी सूर्यो वा ' या ' वा न वा'चा अर्थ काय ? मृत्युपूजा शिष्टमान्य करण्याचे हे यातु कृत्य आहे ( नवभारत नोव्हें. ७२ सप्टें ७३ ). ऋग्वेदातील ही ' वा न वा ' अथर्व वेदांत रहात नाही : ' वृत्रात् जातो दिवाकरः' असे निःसंकोचपणे, तरी श्लेषार्थाआड, सांगितले जाते. पुढे ' वल्मीकस्थ ' नाग संप्रदायी हा कविवर्य, कृष्णपरंपरेच्या श्रीरामचंद्राला ' सूर्य 'वंशी ठरविण्याकरिता सर्वोत्कृष्ट संमोहक कलाकृती रचतो आणि ' इंद्र ' ( पर्यायी सूर्य ) याचा पाडाव केला या अर्थाने ' इंद्रजित् ' पात्र निर्मितो. एवढेच न पुरता, हा ' इंद्र ' ' अहल्या जार ' व्यभिचारी असल्याचे सिद्ध करण्याला खोटा पुरावा निर्माण करतो. पण ही ' अहल्या ' मुळात ' रात्र ' प्रतिमा आहे ! (चित्रावशास्त्री प्राचीन-कोश ' अहल्या पहा ) आणि हा आदिकवी मुळात कोण ? याचा पडताळा दोन प्रकारानी मिळतो : १) वेदांतील ' अग्रे ' ' आदौ ', ' प्रथमे ' हे संकेत भौत-सृजन शक्तीचा ' हिरण्य गर्भ ' देव ' एकाक्ष ' ( किंवा दिव्यचक्षू ) स्वरूपी नाग ( पुरिशय ). हा एकाक्षच आहे हे वेदांतील ' शुक्र ' नामक उशना कवीच्या संदर्भात रंगवणाऱ्या दोन कथेंत आढळेल. ' देवयानी ' शुक्र हा दैत्य दानवांचा गुरु असे संप्रदायच सांगतो. झारीच्या सोंडेत बसलेल्या शुक्राचार्याला, दर्भाची काडी बोचून तो ' एकाक्ष ' झाला म्हणे ! बलीला पृथ्वी दान मिळू नये म्हणून हा आचार्य उदक सोडावयाच्या झारीच्या सोंडेत लपला !

या कृष्ण कारस्थान सूचक काळ्याकुट्ट कथाही आज पचविल्या जातात, कां ? Consciousness of Consciousness : चेतस प्रज्ञा ही अरुणोदय काळीच ' राहु ' ( चंद्र ) ग्रस्त झाल्याने आजही जगांत ' रात्र ' संप्रदायच तगून आहे ! भौतकालगतीच्या संदर्भात डोकावणारी चेतना ' प्रज्ञा ' ' उपज्ञा ' पातळीवर दिसते हे खरे आहे. पण ही ' चेतनात्मक ' ' जाण ' वा -नरांतही असते. ' नर ' हा आपले संदिग्ध किं (?) नरत्व मागे टाकून नवीन जाणिवेचे जाणीवपण या क्षेत्रात पदार्पण करतो पण ' चांद्र'पातळीवरील आकर्षण बेहोश करणारे असते. या आणि एका मितीपर्यंत ही ' तत्'मयता जरूर आहे पण 'तत्-


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

मय ' अवस्थेंत, ही खट्याळ जाणिवेची ' जाण ' हा एक शापच जणूं असे वाटू लागते ! आणि ही जाणिवेची ' जाण ' बधिर करणाऱ्या साहित्य कलाकृती, तत्त्वप्रणालीची मागणी जोरात सुरू होते. मागणी जशी तसा माल ! या विषचक्रांत जग अडकले आहे.

जीवशास्त्रज्ञ ( Biologist ) डॉ. हक्स्ले या सारख्याना आज चेतस = चैतन्य पातळीहून निराळ्या ' Nowhere 'ची पातळीचे अस्तित्व मान्य करणे अनिवार्य वाटत आहे. क्रोबर प्रभृति मानवशास्त्रज्ञ संस्कृति ही, भौत Organic पातळीवरची असे मानणे चुकीचे व सदोष असल्याचे प्रतिपादन करीत असून, संस्कृती ' Super organic ' आहे असे म्हणत आहेत. डॉ. हक्स्ले याना निसर्गातील विकासवादातील ' Emergent ' ( प्रादुर्भावा )ची प्रतीती मानवातील, ' चेतना ' शिवाय आणखी ' प्रज्ञा ' ' उप-ज्ञा ' याचीही दखल घेण्याची आवश्यकता पटलेली दिसते. ते म्हणतात : सामाजिक जीवन–परिसरात "... individuals ... are wholly moved by super–organic social and cultural force" ( New–Bottles for New Wine, p. 72 ).

पण, या ( चेतस– ) प्रज्ञा पातळीचे अवमूल्यन करण्यात, भौतशास्त्रज्ञ, मोक्षवादी संत–महंताच्यावर ताण करीत आहेत. ' Consciousness ' हे Emergent evolutions मुळे शक्य झाले आहे, ' चेतना 'हून निराळे असे अजून मान्य झालेले नाही. ' ज्ञान ' हे ' इंद्रियसंवेदनांच्या ' प्राथमिक आधारावर, पण इंद्रियापलीकडील ' जाण ' ( प्रकाश ) आहे; म्हणून तर मानवाला हे शास्त्रकला–विश्व साध्य होत आले आहे. संकल्पनात्मक ( : invention ) आणि धारणात्मक ( discovery ) या दोनी पातळीवरील जाणिवेत फरक मानला जात नसल्याने एडिसन् ( : संकल्पना ) आणि ऐन्स्टन् (धारणा Discovery) हे दोघे सारख्याच पातळीवरील (जाणिवेचे) तज्ञ म्हणून वाटत आहे.

६ ) वाक् : आणि अर्थ यातील ही उलटा-पालट टाळणे शक्य नाहीं काय ?

मानव-जीवन-पातळीवरील अत्यंत संभ्रम निर्माण होणारी (करणारी) जागा ही : पुरातन परिभाषेत सांगावयाचे तर, सर्प ( : वाक् , देह, प्रकृति, अंधार ... ) आणि सूर्य ( : प्रज्ञा अर्थ, विचार, ज्ञान ).



अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

'दिव्य चक्षु' सिद्धीचा उन्माद; किंवा या सिद्धीमुळे प्राप्त होते म्हणून मानलेल्या 'दिव्याक्षा'ला सत्य' साक्षात्कार होतो; या श्रद्धेमागील अनुभूतीचे स्वरूप – हे 'गुहानिहित' सत्य मानवसमाजाला तारक नसून मारक आहे, सर्वही मोक्षवादी धर्मपंथाच्या इतिहासावरून उघड होत आहे हा 'साक्षात्कारी' मार्ग, भौत ऐंद्रियिक पातळी पलीकडील 'ज्ञाना'ची भाषा वापरतात; पण 'मर्म चा मूर्त च' हे समान परिमितीचे येथे गृहीत आहे! दिव्य ज्ञान हे एका गुरुरूपी व्यक्तीत सामावते. बायबल कुराण, गीता– यासारख्या पोथीत, गत- वर्तमान आगामी सर्वही ज्ञात एके ठिकाणी भौतमाध्यमांत आहे, ही श्रद्धाच मुळी असमर्पक व सदोष आहे.

भौतशास्त्रज्ञानी 'दिव्यज्ञान' पंथीय अयोनिसंभव संकल्पना ( Illegitimate abstraction ) पाहून धडा घेतला, असे दिसते अर्थःज्ञानाच्या पातळीवर माध्यम प्रतिमा नेण्याचा विपरीत मार्ग, या शास्त्राला मान्य झाला नाही पण या शास्त्रातील मूल श्रद्धाही अशीच सदोष दिसते : संस्कृतीच्या व्यासंगातील अर्थपद्धतीत हा दोष उघड होतो. भौगोलिक परिसर हाच संस्कृतीत ( त्याच्या स्फूर्तीसुद्धा ) कारण होय, असे मानण्यात भौत आकृति : माध्यम ( Form) आणि त्यातील अर्थ : आशय (content) हे दोनी समान परिमितीचे आहेत, अशी श्रद्धा येथे दडलेली दिसते !

म्हणजे येथे सरपटणारा ( सर्प ) परिसर, आणि त्या परिसरावर उभ्या संस्कृतीत दिसणारा अर्थ : आशय (रूपी सूर्य), यात 'वा न वा 'कल्पिणे काय ? किंवा त्या दोनी समान, एकात्मक, अभिन्न असे मानणे काय ? दोनीचा परिणाम एकच : सर्पग्रस्त सूर्याराधना : प्रलयाला– मृत्यूला आमंत्रण.

◆ ◆ ◆

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

भाई माधवराव बागल

# छत्रपती शिवाजी महाराज व महाराष्ट्र नेते यशवंतरावजी चव्हाण

आज अनेक लोक अनेकवेळा, सहेतुक असेल, निर्हेतुकपणे असेल, अंध-भक्तीने असेल किंवा पूर्ण विचाराने असेल, त्यांच्या धोरणाकडे व एकूण राजकीय मुत्सद्देगिरी व बहुश्रुततेकडे पाहून असेल किंवा ते केंद्रात मोठ्या मंत्रीपदाचे जागेवर असल्यामुळे त्याना खुष करून लभ्यांश मिळवावा या इच्छेने असेल, किंवा त्यांची टिंगल करण्याच्या कुत्सित बुद्धीने असेल, छत्रपतींच्या नांवाशी यशवंतरावजींचे नाव जोडले जाते एवढे खरे. मीही तसा या दोन नावाचा वापर केला आहे.

तसे पाहिले तर यशवंतरावांचा व माझा घरोबा नव्हता व आजही नाही. पण घरोबा असला व एखाद्याच्या रोज गाठीभेटी पडत असल्या किंवा तो आपला कुटुंबीय असला म्हणजे त्याच्याबद्दल जिव्हाळा असतो, परस्परांवर लोभ असतो किंवा आदर वसत असतो असे नाही. अगदी शेजारी असूनही कसलाही संबंध न ठेवणारे, अडीअडचणीत उपयोगी तर राहू देच पण विचारपूस सुद्धा न करणारे शेकडोनी आढळतील. वर्षानुवर्ष भेट-गाठ न पडणारे, पण जीव तोडून प्रेम करणारेही आढळतील. हा माझा अनुभव आहे.

काय असेल ते असो. यशवंतरावजींच्या बद्दल मला आदर वाटतो. जिव्हाळा वाटतो कुटुंबातला नसून कौटुंबिक भावना वाटते दूर असून जवळचे वाटतात. याच भावना माझ्याबद्दल त्यांच्या मनात असतील असेही नाही. त्यांची मी अपेक्षाही केली नाही. लौकिकदृष्टचा आणि व्यावहारिक दृष्टचा ते एवढ्या मोठ्या अधिकाराच्या जागेवर आहेत की, त्यांना मी मित्र मानणेही अनेकाना प्रौढी वाटेल.

वैचारिक दृष्टचा ते व मी एकमताचे आहोत असे मला म्हणता येणार नाही. कारण त्यांची कृती केव्हा केव्हा माझ्या वैचारिक भूमिकेशी व निष्ठेशी विरुद्ध आणि विसंगत असते; पण पुन्हा मला दुसरे मन सांगत असते की, यशवंतरावांची कृती ही त्यांची मनापासूनची असेल की तो राजकारणातला एक भाग असेल.

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

माझे हे एक विचारमंथन आहे. पण त्याला प्रकट स्वरूप मिळणार नाही असेही नाही. कारण माझे स्वगत, खासगी घरगुती बैठकीतले विचार व लेखनातले व व्यासपीठावरचे विचार जवळ जवळ एकच असतात. त्यामुळे सर्वांना तशी इच्छा नसताही दुखवतो. पण अनेक वर्षांच्या निरीक्षणामुळे व अनुभवामुळे मला वाटते की तेवढ्यामुळे किंवा वैचारिक मतभेदामुळे व त्याला अनुसरून झालेल्या माझ्या कृतीमुळे ते माझा द्वेष करणार नाहीत किंवा मला शत्रुवत मानणार नाहीत. त्यामुळे सर्व सामान्य जनतेत त्यांच्या पक्षात किंवा विरोधी पक्षातही त्यांचा व्यक्तिद्वेष करणारे कोणीही मिळणार नाहीत. आज महाराष्ट्रात दुसरी सर्वमान्य अशी व्यक्ती दुसरी कोणतीही दाखवता येणार नाही. महाराष्ट्राचे एकमेव नेते सर्व गुणदोषा-सकट आज तेच आहेत. अन् जे दोष वाटतात ते राजकारणी पुरुषाचे म्हणजे राजकारणी मुत्सद्याचे अशक्य गुणही ठरतील. माझे हे विश्लेषण यशवंतरावजींना मान्य होणारही नाही. तसे मान्य करणे हेही मुत्सद्देगिरीत बसणार नाही. पण माझा हा अनिर्बंधित स्वैर विहार आहे. त्याला यशवंतराव प्रतिबंध करू शकणार नाहीत. किंवा त्यांचे जाहीर अप्रिसिएशनही करू शकणार नाहीत. कारण मी कोणत्याच सत्तेच्या जागेवर नसल्यामुळे अगर धनलोभांत गुरफटून जाण्याच्या, अगर भीतीने कच खाण्याच्या अवस्थेच्या पलीकडे गेल्यामुळे अंतर्मन व बहिर्मन यातला पडदा काढून टाकणे मला जड जात नाही. यशवंतरावजींनी माझे अनुकरण केल्यास त्याना त्या जागेवर राहता येणार नाही. म्हणून मनाने त्या पदावर जाऊन बसल्याशिवाय यशवंतरावजींच्या कृतीचा व विचाराचा बरोबर मागोवा घेता येणार नाही.

मी मनाने त्या स्थानावर जाऊन बसलो म्हणजे श्रीशिवछत्रपती व यशवंतरावजी यांच्या धोरणात मला साम्य दिसू लागते. कारण समाजाला बरोबर घेऊन जाण्यासाठी त्यांना स्वतःचे प्रामाणिक विचार बाजूस ठेवून वागणे अपरिहार्य होत नसेल कशावरून? कारण जनमानस व व्यक्तिमानस या गोष्टी भिन्न आहेत. त्याना जनमानसालाच प्राधान्य द्यावे लागणार. लोकांना दुखवून राज्य करणे व त्याना आपल्या मागून नेणे त्याना शक्य होणार नाही. आपले प्रामाणिक विचार लोकाना झेपण्याजोगे नसतील तर ते बाजूला ठेवावे लागणार. म्हणून व्यक्ती व समष्टी हे द्वंद्व यशवंतरावजींच्या मनात चालत असणार. तितके शिवछत्रपतींच्या मनात चालत नसणार. कारण त्या वेळचा सर्व समाज धार्मिक, सामाजिक व अंधश्रद्धेच्या रुढीत जखडलेला होता. आज विज्ञानाने, नव विचारांत बरीच प्रगती झाली आहे. फुले-शाहू-आंबेडकर हे वैचारिकदृष्टचा खूप पुढे गेले होते म्हणून


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

शिवछत्रपतींची मानसिक प्रगती व शाहू फुले आंबेडकर यांची एका पातळीवर राहणे शक्य नव्हते तसेच फुले व आंबेडकर यांना राजकीय सत्ता संभाळायची नव्हती. शाहू छत्रपती आपल्या जन्मजात श्रेष्ठत्वामुळे समाजाला आपल्या बरोबर फरफटत नेऊ शकत होते. व अस्पृश्य समाजाला गुलामगिरीतून सोडवणारा नेता हवा होता. त्यांना बहुसंख्य हिंदूंच्या लोकप्रियतेची जरूरी नव्हती. शिवछत्रपतीना सर्वांना बरोबर घेऊन परकीयांची व स्वकीय सरंजामदारांची गुलामगिरी नष्ट करावयाची होती. म्हणून देवाधर्माविषयीच्या खोलवर रुजलेल्या भावनांवर आघात न करता त्यांचाच फायदा घेऊन आपले बळ वाढवायचे होते. म्हणून देवी प्रसन्न होणे, तिने त्यांना आदेश देणे, देवीने भवानी तलवार देणे, या गोष्टी लोकसमूहाला त्यांच्याकडे खेचून नेण्यास उपयुक्त ठरल्या. त्याचे उद्दिष्ट वैचारिक स्वातंत्र्य हे नसून राजकीय स्वातंत्र्य हे होते. समाजातील अंधश्रद्धा काढून त्यांची विवेचक बुद्धी जागृत करावी हे त्यांचे त्यावेळी उद्दिष्टच नव्हते.

महात्मा गांधीजींचा आतला आवाज, विवेचक बुद्धी व ईश्वरभक्ती आणि धर्मश्रद्धा या विसंगत गोष्टींची सांगड घालण्याचा प्रयत्न हा राजकीय मुत्सद्देगिरीचा भाग असणारच नाही असे ठाम विधान करता येईल काय ? मला या विसंगतीत सुद्धा राजकीय सुसंगतीच वाटते. श्रीकृष्णानी वर्णाश्रम धर्माला दिलेला पाठिंबा, व राजात बसवलेला ईश्वरी अंश व युद्धात भाग घेणाऱ्याना स्वर्गसुखाची दिलेली हमी ही प्रामाणिकपणाची म्हणायला मी तरी धजत नाही. कृष्ण हा थोर महात्मा नसून राजकीय स्वार्थसाधूच दिसतो.

यशवंतरावांची परिस्थिती शिवछत्रपतींच्याहून अधिक बिकट आहे. कारण आजच्या समाजात कांही पुरोगामी विचारवंत आहेत. तसेच समाजवादी आहेत. कम्यूनिस्ट आहेत. कट्टर मार्क्सवादी व क्रांतिकारक आहेत. जनसंघ वगळला तर मूर्तिपूजा जुनी धर्मपरंपरा टिकवल्याचा प्रयत्न करणारे नाहीत. फुले शाहू आंबेडकरांच्या विचाराने बहुजन समाजात जागृती झाली आहे. सत्यशोधक जलसे तमासे यांनी भटशाही व पुरोहितशाहीवरचा आदर कमी केला आहे. म्हणून यशवंतरावना तारेवरचा नाच करावा लागत असणार. समाजातल्या वरच्या ब्राह्मण व मराठे पांढरपेशाना धार्मिक वर्चस्व घालवून आपली धार्मिक व पारंपरिक श्रेष्टता घालवायला नको आहे. या सर्वांना शत्रू न करता राजशकट चालवायचा आहे. म्हणून अंतर्मन व बहिर्मन याची सांगड घालणे हे शिवछत्रपतींच्या कालाहून अवघड आहे. म्हणून तुळजापुरच्या भवानीला यशवंतरावजीनी जाणे व तिरुपतीला इंदिराजीनी जाणे याचा अर्थ लावता येईल.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

दोघेही खरेच प्रतिगामी असतील. मूर्तिपूजक असतील असे मला वाटत नाही. येथे शिवछत्रपतींची राजकीय मुत्सद्देगिरी व यशवंतरावांची मुत्सद्देगिरी एकाच साचात बसेल.

संयुक्त महाराष्ट्र आंदोलनाचे वेळी यशवंतरावानी घेतलेली भूमिका यशवंतरावजींच्या दूरदर्शी स्वभावावर व त्यांच्या मुत्सद्देगिरीवर बराच प्रकाश पाडू शकेल. या वेळी आम महाराष्ट्रीय जनतेला, सर्व पक्षांना संयुक्त महाराष्ट्र व्हायला हवा होता. मुरारजी उलट नेहरूही अनुकूल नव्हते. मी तर या चळवळीतला एक नेताच होतो. यशवंतरावजी उलटही नव्हते व सहभागी नव्हते. पंतप्रधान नेहरूंना दुखवून चळवळीत सामील होण्यास तयार नव्हते. महाराष्ट्र मोठे की, नेहरू मोठे असा प्रश्न निघाला तेव्हा आपण नेहरूनाच मानणार असे त्यांनी उद्‌गार काढल्याचे प्रसिद्ध झाले होते. मी तर चळवळीस वाहून घेतले होते. प्राण धोक्यात घालून चळवळीत पडलो होतो. यशवंतरावजींच्या पडखाऊ धोरणामुळे मी खवळून गेलो होतो. याच सुमारास मी त्यांना मुंबईस भेटलो. फलटणच्या बैठकीत काँग्रेसचे ठरलेले धोरण जाहीर झाले होते. त्या संदर्भातच माझे बोलणे झाले. त्यावेळी यशवंतरावजी मला म्हणाले –

माधवरावजी तुमचा मार्ग निराळा, माझा निराळा.

त्यावर मी जो भडकून बाहेर पडलो ते यशवंतरावजीना लाखोली वहात. माझा तोल सुटला होता. शिष्टाचार सुटला होता. कधीही न पडणारे असभ्य शब्द तोंडावाटे बाहेर पडत होते. जन्मात न वापरलेली भाषा व्यासपीठावर बाहेर पडत होती. पण त्या आवेगानंतर माझीच मला लाज वाटू लागली. यशवंतरावजींनी मला तुरुंगात टाकणं अवघड नव्हते. मलाही त्याची भीती वाटत नव्हती. छ. राजाराम महाराजांच्या कृपेने मला तुरुंगाचा सराव झाला होता व मी एक सराईत राजद्रोही गुन्हेगार पूर्वीच बनलो होतो. प्रतापगडच्या मोर्चात मी पुढाकार घेतला होता. तो ठराव माझ्याच अध्यक्षतेखाली झाला होता. नेहरूंचा धिक्कार करणारा तो मोर्चा होता.

पण यानंतर चळवळीला निराळे वळण मिळाले. यशवंतरावजींनी आमच्या मागणीची इष्टता नेहरूंना पटवून दिलीच व आमच्या पदरात संयुक्त महाराष्ट्राचा कलश दिला. चळवळीचे व यशवंतरावजींचे ध्येय एकच होते. मार्ग भिन्न होते. आमच्या इच्छेला अनुसरून यशवंतरावजींनी आपल्या अधिकारपदाचा राजिनामा दिला असता, तर नेहरूंची संयुक्त महाराष्ट्राला संमती


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

मिळणे फारच जड गेले असते. आम्ही बाहेरून प्रक्षोभ माजवला. यशवंतरावजींनी आत राहून अनुकूल भूमिका तयार केली. लोक आणि सत्ता यांचा समन्वय घडून आणला. सत्ता गमावली असती तर बहुजनसमाजाला वर आणण्याकरिता ज्या गोष्टी करता आल्या त्या आल्या नसत्या.

खरोखरीच नांगर धरणाऱ्या शेतकऱ्याचा मुलगा मुख्यमंत्रिपदावर आरूढ झालेला आमच्या डोळ्याला दिसला नसता.

यशवंतरावजींनी हातची सत्ता टिकवून लोककल्याण साधले व तात्पुरता लोकक्षोभ सहन केला. यशवंतरावांचे अंतर्मन व बहिर्मन यांची सांगता झालेली येथे पहावयला मिळते. हेच धोरण अवलंबून ते महाराष्ट्राचे नेतृत्व राखून केन्द्रात पंतप्रधानांच्या शेजारी जाऊन बसले आहेत. आपल्या असीम निष्ठेने त्यांनी नेहरूंना जिंकले. तीच निष्ठा पूर्ण विचाराने व प्रासंगिक लोकांचे बोल व कांहींची निर्भर्त्सना सहन करून इंदिराजींना दिली व त्यांचा तसाच विश्वास संपादन केला व महाराष्ट्राचा हा भाग्यविधाता आपल्या सर्व शक्तिनिशी व निष्ठावान कार्यकर्त्यानिशी आता इंदिराजींच्या पाठीशी उभा राहिला आहे. माधवराव बागलासमोर राजकीय सत्ता हे ध्येयच नसल्यामुळे हा तारेवरचा नाच करावा लागला नाही; व त्या चळवळीत देवधर्म, अंधश्रद्धा याविरुद्ध झगडा नसल्यामुळे आजच्याप्रमाणे लोकप्रियता गमावण्याचे कारणच नव्हते. आजही मला कसलेच अधिकारपद गमवायचे नसल्यामुळे मला माझ्या प्रामाणिक विचाराला मुरड घालून विचार व आचारात विसंगती निर्माण करण्याचे कारणच पडत नाही. लोकक्षोभाला बळी पडलो सारखे, राजकोपाला बळी पडलो सारखे, माझी ही भूमिका यशवंतरावजींना स्वीकारणे शक्य नाही. यशवंतरावजी व इंदिराजी यांनी क्षणिक मूर्तिपूजा का केली याचे समर्थन माझ्या समाधानासाठी मी असे करून घेतो– कदाचित माझी ही फसवणूक करून घेत असेनही.

शिवछत्रपतींनी निरनिराळ्या वेळी आपल्या लढाऊ नेतृत्वाला न शोभेल अशी वागणूक का केली? शरणागति का पत्करली? आपले मिळवलेले किल्ले परत बहाल करून मांडलिकत्व पत्करण्याचे सोंग का केले. देव धर्म अंधश्रद्धा याचा फायदा कसा घेतला व का घेतला. याचा उलगडा– ध्येयसिद्धीसाठी सुचतील ते उपाय स्वीकारले असाच करावा लागतो. पण अशा राजकीय नेत्यांच्या खऱ्या स्वभावाची पारख राजकीय कार्यावरून करता येणार नाही. त्यांच्या अंतर्मनाची, माणुसकीच्या हृदयाची पारख त्यांच्या हातून, खाजगी जीवनात घडलेल्या गोष्टीवरूनच करता येते. कोट्याधीशाने सार्वजनिक संस्थेस लाखो रुपयाची देणगी

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

देणे व गरीब माणसाने दुसऱ्या दरिद्री व्यक्तीस समोरचा घास काढून देणे यात त्या भाकरीची किंमत अधिक आहे.

शाहू महाराजांच्या हृदयाची उदात्तता, कनवाळूपणा, सहृदयता, व खरा माणूसपणा मला जो कळला तो केवळ त्यांच्या राजकीय चरित्रातून नव्हे. पण ज्या गोष्टीला कधीही प्रसिद्धी मिळणार नाही व तशा प्रसिद्धीची अपेक्षाही त्यांना शिवली नाही अशा खाजगी जीवनातून प्रत्यक्ष आलेल्या संबंधातून व तशा संपादन केलेल्या सामान्य जनतेच्या गोर-गरीबांच्या आठवणीतून.

यशवंतरावजींचे राजकीय जीवन हा उघडा ग्रंथ आहे. त्याबद्दल वर्तमान-पत्रातून अनुकूल प्रतिकूल टीका रोज होत आहेत. त्या सर्व पचवून महाराष्ट्राचे एकमेव नेते म्हणून ते अद्याप खडे आहेत. पण त्यांच्या क्षणिक सहवासातून मला जे मौलिक मोती गोळा करता आले. त्यांनी खऱ्या यशवंतरावावर प्रकाश पाडला. ज्याप्रमाणे शाहू महाराजांच्या अष्टपैलू जीवनाच्या आत्मिक दर्शन घडविणाऱ्या कथा समाजात विखुरलेल्या अद्यापही वेचता येतात त्याचप्रमाणे प्रयत्न न करूनही यशवंतरावजींच्या कथा कानावर पडतात. आणि मला स्वत:लाच ज्या सापडल्या त्याने माझे जीवनही समृद्ध केले आहे.

मतभेद राखूनही प्रेम कसे करावे व प्रेमाचा धागा अतूट कसा ठेवावा त्याचे प्रात्यक्षिक मला यशवंतरावजींच्या वागणुकीत मिळाले. ज्यांच्यावर मी लाखोली वाहिली त्यांची त्यांनी मला चुकूनही आठवण दिली नाही.

आपल्या संकटकाळी यशवंतरावजींनी आपल्याला साहाय्य केले असे सांगणारे अनेक लोक मला भेटले. पण यशवंतरावांच्या तोंडून मी त्याला असे केले, मी त्याला मोठे केले असा शब्द चुकूनही बाहेर पडलेला ऐकलेला नाही.

जो एका हाताने दिलेल्याची जाणीव दुसऱ्या हाताला देत नाही तोच खरा दाता होय.

आपल्याहुन मोठ्या माणसाला आदराने वागविणे, मान देणे यांत विशेष काही नाही. पण सामान्य खेडूताला तोच आदर दाखविणे व मान देणे ही गोष्ट सामान्याची नव्हे. या गोष्टी मी आपल्या डोळ्यांनी पाहिल्या आहेत.

व्यासपीठावरून समतेची घोषणा करणाऱ्याहून या घरगुती वागण्यातील समानता अधिक परिणामकारक ठरते. त्यात ढोंग नसते. प्रसिद्धीची हाव नसते. त्यांत खरा आत्म्याचा विकास आढळतो. त्याची छटा मी अनुभवली आहे. म्हणून केंद्रातील अर्थमंत्र्याहून प्रेमाची नाणी संग्रही ठेवणारा यशवंतराव मला मोठा वाटतो, आदरणीय वाटतो. म्हणून इथे अहो जाहो हा शब्द आपोआप गळून जातो.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

बेळगाव व सीमा प्रश्नाला जे भयंकर स्वरूप आले त्याने मन विषण्ण होते. आम्ही महाराष्ट्रीय असो, कर्नाटकी असो आम्ही भारताचे ही भावना यावेळी तरी नष्ट झाली आहे. मी तर संयुक्त महाराष्ट्र व या बेळगाव प्रश्नाला सर्वस्वी वाहून घेतले होते. खुद्द बेळगावला जाऊन सत्याग्रह केला व त्यांच्या तुरुंगात पडलो. हिंडलग्यानंतर मंगळूरच्या तुरुंगात नेले. तिथे मराठी बोलणारे अधिकारी नव्हते व कैदीही नव्हते. तिथे पाच सात महिने काढले. नंतर अखेरची एस्. एम्. जोशी यांच्या अध्यक्षतेखाली जी परिषद झाली तिचा उद्घाटक होतो व मी उपाय सुचवला की, आम्ही सर्व नेते मंडळी आमरण उपोषण करण्यास बसू या– पण ती सूचना कोणीही स्वीकारली नाही पण त्यानंतर १९७३ डिसेंबरला आम्ही परस्परांचा नाश करण्यास उद्युक्त झालो. अनेक प्राणास मुकले. कोटयवधी रुपयाचे खासगी व सार्वजनिक नुकसान झाले. शत्रुत्व अतिरेकाला गेले.

यावेळीं यशवंतराव हे अर्थमंत्री होते. हा विषय त्यांच्या खात्यात मोडत नव्हता. त्यांचे विचार सर्वांना माहीत होते. पण यावेळी बोलण्याचा राजकीय दृष्टया त्याना अधिकार नव्हता म्हणून उगाच महाराष्ट्रीयाना खूष करण्या-करता पुनः त्याच विचाराला प्रसिद्धी देणे हे राजकीयदृष्टया ते ज्या जागेवर आहेत त्या दृष्टया चुकीचे होते. अव्यवहारी होते, न शोभण्या-जोगे होते. म्हणून त्यांची यावेळची मुग्धता ते ज्या मंत्रीपदावर होते तिला आवश्यक होते. केवळ महाराष्ट्रीयाना खूष करावे म्हणून बोलले असते तर हा अव्यापारेषु व्यापार केला म्हणून इंदिराजीच्या रोषास पात्र झाले असते. राजिनामा देऊन मोकळे झाले असते तर भारताचे व महाराष्ट्राचे त्यांचे शक्तीनुसार त्या जागेवरून हित करता आले नसते, त्याला मुकले असते. दिल्लीतील मत्सरग्रस्थाना आपल्याला आता पुढे सरकायला वाव मिळाला म्हणून आनंद झाला असता. राजिनाम्याने प्रश्न सुटला असता असेही नाही. आतापर्यंत महाराष्ट्राचा वजनदार नेता दिल्लीत यापूर्वी केव्हाही प्रभाव पाडू शकला नाही तो यशवंतरावजींच्या राजिनाम्याने महाराष्ट्राने गमावला असता. या प्रश्नावरच्या राजिनाम्याने इतर प्रांताला ते भारतीय नेते न वाटता प्रांतीयच वाटले असते. मी भारताचा नंतर महाराष्ट्राचा हीच भूमिका खऱ्या भारतीय नेत्याला घेणे भाग आहे.

माझ्या दृष्टीने यशवंतरावजींची यावेळची भूमिका खऱ्या मुत्सद्याला शोभण्या जोगीच आहे. आहे त्या जागेवर राहूनच ते महाराष्ट्राची व भारताची अधिक सेवा करतील.



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

डॉ. नी. र. वऱ्हाडपांडे

# सत्तावनचे स्वातंत्र्ययुद्ध आणि त्याचे निंदक : ६

सत्तावनच्या क्रांतियुद्धाने एका नाजुक स्त्रीला रणदेवता बनविले तसेच एका साध्या कारकुनाला ब्रिटिशांच्या मुरलेल्या सेनापतीशी झुंज देण्याची स्फूर्ती दिली.

तात्या टोपे हा पेशव्यांच्या वाड्यातला एक साधा कारकून होता. त्याला युद्धशास्त्राचे शिक्षण व युद्धाचा अनुभव मिळालेला नव्हता. एवढी पूर्वतयारी असता अचानक बंड करून उठलेल्या शिपायांचे सैन्य घेऊन इंग्रजासारख्या विश्वविजयी शत्रूशी लढण्याची जबाबदारी त्याच्यावर येऊन पडली. ती त्याने उत्साहाने पत्करली. इंग्रजांनी कानपूर काबीज केले, क्रांतिकारी सैन्याची वाताहत झाली. तेव्हा तात्या टोपे ग्वाल्हेरला गेला व मुराच्या छावणीतले सैन्य फितवून त्याने आपल्या बाजूस आणले. या सैन्याच्या साहाय्याने त्याने कानपूरजवळील काल्पीचा किल्ला काबीज केला व पुढील लढायासाठी काल्पी हा तळ बनवून कानपूर इंग्रजांच्या तावडीतून सोडविण्यासाठी कानपूरवर मोर्चा वळविला. कानपुरच्या ब्रिटिश फौजांवर यावेळी जनरल विंडहॅम हा सेनापति होता. विंडहॅमने युरोपच्या रणांगणावर नाव कमावले होते. अशा सेनापतीशी टक्कर देण्यास बंड करून उठलेले शिपायी व त्यांच्यात उत्साहाने सामील झालेले काही अडाणी शेतकरी यांना घेऊन कालचा कारकून तात्या टोपे कानावरची लेखणी खाली ठेवून जिचे नुकतेच पाणिग्रहण केले होते ती तलवार परजून सरसावला. आपले कोठार जालन्याला ठेवून त्याने कानपूरच्या आसपासची काही खेडी आणि वाटेतील महत्त्वाची ठाणी काबीज केली व शिवराजपुराकडे धडक मारली. यामुळे विंडहॅमच्या सैन्याची नाकेबंदी होऊ लागली.

## हरिण लांडग्याचा पाठलाग करते

विंडहॅमला असे शिकविण्यात आले होते की आशियाई सैन्ये आपल्या तोंडावर शत्रूने बेधडक चाल केली की कच खातात मग शत्रूचे बल कितीही

अनुक्रमणिका


राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

कमी का असेना ? या शिकवणुकीनुसार तात्या चालून येण्याची वाट न पाहता विंडहॅमच काल्पीजवळील एका पुलापर्यंत येऊन धडकला.

तात्या सिरखंडीवरून पांडूनदीवर आला तेव्हा विंडहॅमने त्याच्यावर सरळ हल्ला केला. तात्याने जंगलाच्या आश्रयाने इंग्रजी फौजांवर तोफांचा मारा केला. पण विंडहॅमची सुरवातीची धडक यशस्वी होऊन तात्याच्या तीन तोफा त्याने काबीज केल्या. आपण नेहमीप्रमाणे विजयी झालो म्हणून विंडहॅम हुरळून गेला. पण इंग्रजांचे नेहमीचे भाग्य यावेळी पारखे झाले आहे हे त्याला लवकरच भयंकर रीतीने कळून चुकले. तात्याचे "एशियाटिक" नेहमीप्रमाणे गोऱ्यापुढे पळ न काढता सरळ तोंडावर चालून आले व गोऱ्यांनाच पळ काढावा लागला. हरिणच लांडग्याचा पाठलाग करू लागले. गोऱ्या फौजेने पळून थेट कानपूर गाठले.

तात्याही ससाण्यासारखा मागून आला. इतक्यात शेवली आणि शिवराजपूर येथील क्रांतिकारकांच्या साऱ्या टोळ्या तात्यांच्या मदतीस आल्या व त्यांनी इंग्रजी फौजेच्या उजव्या फळीवर गोळीबार सुरू केला. इंग्रजी फौजा माघार घेऊ लागल्या. तात्याने आपल्या सैन्याची व्यूहरचना अर्धवर्तुलाकार केली. या अर्धवर्तुलाच्या कैचीत सारी ब्रिटिश फौज फस्त करण्याचा तो प्रयत्न करू लागला. या कैचीचा भेद करून जाण्याची विण्डहॅमने शिकस्त केली पण ती अभेद्य असल्याचा त्याला अनुभव आला. त्याची डावी फळी तोफा सोडून पळाली. उजवी फळीही लवकरच मोडली. इंग्रजांचे हजारो तंबू, बैल व इतर रसद तात्याच्या हाती आली. अर्धे कानपूरही त्याने काबीज केले.

माघारी गेलेल्या विण्डहॅमने दुसऱ्या दिवशी सकाळी पुनः हल्ला केला. हल्ला निकराचा होता पण तो लाटांनी खडकावर हल्ला करावा त्याप्रमाणे विफल ठरला. ब्रि. विल्सन, मे. स्टर्लिंग, कॅ. मॅक्री वगैरे इंग्रज अधिकाऱ्यांचे मुडदे पडले. संध्याकाळपर्यंत तुंबळ युद्ध होऊन इंग्रजांचा निःपात झाला. व सारे कानपूर तात्याच्या हाती आले.

तात्याच्या या विजयाबद्दल चार्लस बालच्या इण्डियन म्यूटिनी या ग्रंथात पुढील उद्‌गार आढळतात : "सर्वत्र विजयी म्हणून विश्वविख्यात असलेल्या इंग्रजी फौजेने भारताच्या तुच्छ गणलेल्या रहिवाशासमोर हार खाल्ली ! तिचे सारे शिबिर व शस्त्रास्त्रे भारतीयांच्या हाती सापडली. भारतीयांसमोर आपले हत्ती, घोडे व उंट घेऊन "फिरंगी" पळत सुटले. फारच लाजिरवाणी घटना घडली."



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

तात्याची गरुडभरारी

तात्या टोपेने केलेला विण्डहॅमचा पराभव कौतुकास्पद असला तरी त्याचे नाव त्या काली भारतात व युरोपात सर्वतोमुखी झाले ते विण्डहॅमच्या पराभवामुळे नसून त्याच्या गनिमी काव्यामुळे. शूराची खरी परीक्षा पराभवाच्या काळी होते. दिल्ली, लखनौ, झाशी, काल्पी, कानपूर व ग्वाल्हेर हे क्रांतीचे सारे बुरुज ढासळून पडले. राणी लक्ष्मीबाई व राजा कुमारसिंग हे योद्धे इहलोक सोडून गेले. इंग्रजांची सर्वत्र सरशी झाल्यामुळे नवीन पलटणी बंड करून उठणे तर दूरच, बंड करून उठलेले शिपायी देखील शरणागती पत्करू लागले. आता सर्व संपलै असेच सर्वांना वाटले असले पाहिजे. पण अशा हताश परिस्थितीत देखील तात्याने शस्त्र खाली ठेवले नाही. इंग्रजाशी समोरासमोर लढायचे सोडून त्याने आता गनिमी काव्याचा अवलंब केला. एक समकालीन इंग्रज लिहितो, यानंतर तात्याने पीछेहटीचा डाव अशा अद्भुत रीतीने मांडला की त्याचा पूर्वीचा पराभव कःपदार्थ वाटू लागला. पूर्ण पराभवानंतर देखील दहा महिने त्याने लढा चालू ठेवला. त्याचे नाव साऱ्या युरोपात त्याचा पराभव करणाऱ्या इंग्रज सेनापतीपेक्षाही अधिक गौरवाने उच्चारले जाते. त्याचे काम जवळ जवळ अशक्य कोटीतले होते. सतत पराभवामुळे खचलेल्या शिपायांना संघटित ठेवून धीर देणे, त्यांच्यासाठी शस्त्रास्त्रे व अन्नपाणी यांची व्यवस्था करणे व चारी बाजूने लांडगेतोड करीत असलेल्या ब्रिटिश फौजांपासून कधी हुलकावण्या देऊन तर कधी तोंड देऊन आपला बचाव करणे. अशाही परिस्थितीत तात्याने नवीन सैनिक गोळा केले, रोजी साठ मैलाच्या वेगाने भराऱ्या मारल्या, अनेक शहरे काबीज केली व इंग्रजांना उसंत मिळू दिली नाही." (Friend of India)

१७ जानेवारी १८५९ चा टाइम्स लिहितो : 'आमचा उल्लेखनीय मित्र तात्या टोपे हा मोठा त्रासदायक व चाणाक्ष शत्रू आहे. त्याची स्तुति कशी करावी ? अनेक महिन्यांपासून सारे मध्यहिंदुस्थान त्याच्या नावाने दुमदुमत आहे. त्याने आमची ठाणी व खजिने लुटले. नवी सैन्ये उभारली व गमावली. त्याचे एक सैन्य नाहीसे करावे तोच तो दुसरे उभे करतो. त्याची गरुडभरारी बहुशाख सौदामिनीप्रमाणे आहे. त्याने नर्मदा दोन्ही बाजूने पार केली, आमच्या फौजांच्या मागे, पुढे व मध्ये देखील अनिबंध संचार केला. एरियल देखील एवढा सूक्ष्मगामी नव्हता. नद्या, पर्वत, दऱ्या व दलदली याला अडवू शकत नाहीत. तो पोर्टिअससारखा हुलकावण्याबहाद्दर आहे."

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

## राजा कुमारसिंग

सत्तावनच्या उठावाने एका कारकुनाला सेनापतीची क्षमता दिली तसेच ऐंशी वर्षांच्या एका वृद्धामध्ये स्वतःचे शरीर संभाळण्यासाठी काठीचा आश्रय घेण्याऐवजी तरवारीच्या तांडवाने रणांगणावर शत्रूची मस्तके उडविण्याचे सामर्थ्य दिले. ऐंशी वर्षांचा हा भीष्माचार्य म्हणजे राजा कुमारसिंग. कुमारसिंगाची वीरगाथा, तात्या टोपे व राणी लक्ष्मीबाई यांच्या इतकीच रोमांचकारी असून देखील त्याबानाने अप्रसिद्ध आहे ही फार शोचनीय गोष्ट आहे.

कुमारसिंग उठावाची तयारी करीत आहे अशा अनेक तक्रारी पाटण्याचा कमिशनर टेलर याच्याकडे पोचल्या होत्या पण ऐंशी वर्षांचा म्हातारा इंग्रजाविरुद्ध युद्धास उभा ठाकणार आहे ही कल्पनाच टेलरला अशक्य कोटीची वाटली. तरीपण सेनापति या नात्याने नव्हे तरी कारस्थानांचे केंद्र म्हणून "बंड" वाल्यांना त्याचा उपयोग होण्याचा संभव होता. म्हणून कुमारसिंगाला आपल्या घरी बोलावून कपटाने अटक करण्याचा टेलरने डाव रचला. ( अफजलखानप्रसंगाबद्दल गाजावाजा करणाऱ्या इंग्रज इतिहासकारांना यात काहीच विशेष घडले असे वाटत नाही हे लक्षात ठेवण्यासारखे आहे ) "तुमचे वय झाले आहे, तुमची प्रकृतीही बरी नसते. म्हणून तुमच्या भेटीस मी उत्सुक आहे" असा टेलरने निरोप पाठवला. त्यावर कुमारसिंगाने उत्तर दिले: "खरेच आहे. मी आजारी आहे. त्यामुळेच मी येऊ शकणार नाही. मला बरे वाटले की येईन."

कुमारसिंगाला लवकरच "बरे वाटले" व तो जाण्यास निघाला.

दानापुरच्या शिपायांची टोळी घेऊन तो ब्रिटिश सत्तेचा नाश करण्यासाठी जगदीशपुरातून बाहेर पडला. त्याने आरा काबीज केले, तेथील खजिना ताब्यात घेतला व ब्रिटिश सत्तेची चिन्हे नष्ट केली.

ही बातमी ऐकताच डनबारच्या नेतृत्वाखाली एक ब्रिटिश दळ आऱ्यावर चाल करून येऊ लागले. रात्रीची वेळ होती. आरा जवळ आला तरी कुमारसिंगाचे कुठेच चिन्ह दिसेना. आपल्या आगमनाची वार्ता ऐकताच म्हातारा पळून गेला अशी डनबारला आशा वाटली. तोच भोवतालच्या आम्बराईतून सू सू गोळ्या सुटू लागल्या व डनबारचा एकेक सैनिक कोसळू लागला. आम्बराईमध्ये सैनिक कुठेही दिसेनात. आम्ब्याची झाडेच फैरी झाडत आहेत की काय असे वाटत होते. डनबारचा बळी पडला. बाकीचे फिरंगीही



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

पळू लागले. पळता पळता एका खड्ड्यामध्ये त्यांनी आश्रय घेतला. पण कुमारसिंगाच्या धडकीमुळे आपल्या जखमी साथीदारांना तेथेच सोडून ते शोण नद्याकडे पळाले व आपल्या नावा शोधू लागले. पण पुष्कळशा नावा कुमारसिंगाच्या शिपायांनी जाळून टाकल्या होत्या.

## वृद्ध योद्धयाचे वृकयुद्ध

पुढे ब्रिटिश फौजांच्या वाढत्या सामर्थ्यामुळे कुमारसिंगाला आपली राजधानी जगदीशपुर सोडावी लागली व त्याने गनिमी काव्याचा अवलंब केला. बीव्हवामधील क्रान्तिकारक त्याने आपल्या जोडीस घेतले व अन्त्रोलियावर झडप घातली. अन्त्रोलिया अजिमगडापासून २५ मैलावर आहे. कुमारसिंग अजिमगडाच्या इतक्या जवळ आलेला पाहून मिलमन कुमारसिंगावर चालून गेला. कुमारसिंगाने त्याला सरळ तोण्ड न देता हूल दिली व तो सैन्यासकट दिसेनासा झाला. मिलमनचे सैन्य रात्रभराची मजल मारून दमलेले होते. शत्रूशी लढावे न लागताच जय मिळाला म्हणून मिलमन हुरळून गेला व त्याने सैन्यास नास्ता करून विश्रान्ति घेण्याची परवानगी दिली. सारे सैन्य एका आम्बराईखाली आराम करू लागले. कोणी पावाचा तुकडा तोण्डात घातला, कोणी चहाचा पहिला घुटका घेतला तोच...

"धाड् धाड्!!" कुमारसिंगाच्या बन्दुका गरजू लागल्या नाश्त्याची बैठक उधळली. तोण्डातले घास गळून पडले. आपल्या शस्त्रापर्यन्त पोचायच्या आधीच काही सैनिक पालथे झाले. उसाची शेते, आंब्याची झाडे, मातीचे ढीग यांच्यातून कुमारसिंगाच्या गोळ्या सू सू सुटत होत्या. मिलमनने पळ काढला. कुमारसिंगाने त्याची लांडगेतोड सुरू केली व मिलमनला अजिमगडापर्यन्त पिटाळले.

अजिमगडामध्ये आणखीही ब्रिटिश फौज होती. ती मिलमनच्या मदतीला आली. व या दुहेरी फौजेने कुमारसिंगावर फेरहल्ला केला. पण कुमारसिंगाने पूर्वीप्रमाणेच कच खाल्याचे सोंग करून ब्रिटिश फौज अडचणीच्या ठिकाणी आणली व तिच्यावर हल्ले सुरू केले. पुनः ब्रिटिश फौजेने पळ काढला व ती अजिमगडातील तटबन्दीच्या आड दडून बसली. कुमारसिंगाने अझिमगड काबीज केले व तो वाराणसीच्या रोखाने कूच करू लागला.

आता कुमारसिंग वाराणसी व अलाहाबाद घेऊन कलकत्ता व दिल्ली यांच्यामध्ये पाचर मारतो की काय अशी कॅनिंगला धास्ती वाटली व त्याने



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

मार्क करला नवी फौज देऊन कुमारसिंगावर पाठविले. मार्क अजिमगडाजवळ येऊन पोचला व त्याने ताबडतोब कुमारसिंगाच्या डाव्या फळीवर हल्ला सुरू केला. कुमारसिंगाजवळ तोफा नव्हत्या. तरीपण मार्कच्या अग्निवर्षावाला बन्दुकांनी प्रत्युत्तर देत तो मार्कच्या पिछाडीवर येऊन धडकला. आता मार्कचा सारा पवित्राच बदलला. समोरच्या तोफा त्याने मागे आणल्या व तोफांच्या साऱ्याने शत्रूवर चढाई करण्याचा प्रयत्न न करता तोफांनी आपली पिछाडी संभाळत अजिमगडाकडे पळ काढला. पण अजिमगड क्रान्तिकारकांच्या हातात होते म्हणून अजिमगडातही मार्ककरची डाळ शिजली नाही.

## पाठशिवणीचा खेळ

इकडे अजिमगडातील ब्रिटिश फौजेला मदत देण्यासाठी जनरल लूगार्ड निघाला. त्याच्या वाटेत तनू नदीचा पूल होता. लूगार्डला अडवण्यासाठी कुमारसिंगाने या पुलावर आपले निवडक सैनिक ठेवले व आपली मुख्य फौज दृष्टिआड होईपर्यंत लूगार्डला नदी पार करू देऊ नये अशी कामगिरी त्यांच्यावर सोपविली; लूगार्डने पुलावर हल्ल्यावर हल्ले केले पण कुमारसिंगाचे सैनिक अचल राहिले. त्यांनी लूगार्डचे सारे हल्ले मारून काढले. अनेक तास गोळागोळी झाल्यावर कुमारसिंगाचा संकेतध्वनि आकाशात दुमदुमला. त्याबरोबरच त्याचे सैनिक शिस्तीने पूल सोडून कुमारसिंगाला जाऊन मिळाले. पूल मोकळा झालेला पाहून लूगार्ड नदी पार करून आला. पण कुमारसिंगाचे सैन्य दिसेनासे झाले होते. कुमारसिंगाने अजिमगड सोडून जगदीशपुराकडे मोर्चा वळविला होता.

कुमारसिंगाचा पाठलाग करण्यासाठी लूगार्डने घोडदळाची एक तुकडी पाठवली. ही तुकडी माऱ्याच्या टप्प्यात येताच कुमारसिंगाने तीव्र गोळ्यांचा वर्षाव करण्यास सुरवात केली. एकेक फिरंगी कोसळू लागला; व लवकरच पाठलाग करणाऱ्यानीच पळ काढला. ही बातमी ऐकून डग्लस ताजी फौज घेऊन लूगार्डच्या मदतीस आला. तेव्हा कुमारसिंगाने आपल्या फौजेचे तीन भाग केले. एका भागाला डग्लसचा हल्ला रोखून धरण्याचे काम सांगण्यात आले व दुसरे दोन भाग निरनिराळ्या मार्गांनी मार्गक्रमण करू लागले. पहिल्या भागाने डग्लसचा हल्ला अंगावर घेतला. त्याच्यावर तोफा आग ओकीत होत्या. त्याना प्रत्युत्तर देण्यास क्रांतिकारकाजवळ तोफा नव्हत्या. तरी पण आपली फळी कायम ठेवून ते तोफांनी, बंदुकांनी प्रत्युत्तर देत होते व हलके हलके मागे हटत होते. या प्रकारे त्यानी चार मैल अंतर कापले. तेवढ्या वेळात दुसरे दोन

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

भाग इष्ट स्थळी एकमेकास मिळाले. ही बातमी कळताच तिसऱ्या भागानेही आपला वेग वाढविला व तोही मुख्य फौजेस येऊन मिळाला.

इकडे रात्रभर विश्रांति घेऊन डगलसची फौज पुनः पाठलागास निघाली. तोपर्यंत कुमारसिंग १२ मैल पुढे निघून गेला होता. मोठ्या शिकस्तीने मनोहर येथे डगलसने कुमारसिंगास गाठले. मग कुमारसिंगाने पुनः हूल दिली व तो गंगेच्या काठावर येऊन थडकला. डगलस मागून येत होताच. तातडीने गंगा पार होणे आवश्यक होते. तेव्हा कुमारसिंगाने अशी हूल उठविली की बलिला येथे हत्तीच्या साहाय्याने तो गंगा पार करणार आहे. डगलसच्या हेरांनी ही बातमी आणली तेव्हा डगलसने त्याची पाठ थोपटली व तो तत्काळ बलिल्याकडे गेला आणि कुमारसिंगावर झडप घालण्यासाठी दबा धरून बसला. या पवित्र्यातच तासन् तास निघून गेले. पण कुमारसिंगाचा पत्ता नाही. कसा असणार ! कुमारसिंग सात मैल खाली निर्धास्तपणे गंगा पार करीत होता. त्याचे सारे सैन्य पार गेले. शेवटी तोही नावेत बसून प्रवाहाच्या मध्यापर्यंत येऊन पोचला. इतके सर्व झाल्यावर लूगार्डची फौज काठाशी आली. फिरंग्यांनी गोळ्या झाडायला सुरवात केली. त्यातील एक गोळी कुमारसिंगाच्या मनगटात घुसली पण तिकडे दुर्लक्ष करून त्याने सुखरूपपणे गंगा पार केली. व पुनः आपली राजधानी जगदीशपुर येथे विजयप्रवेश केला.

## विजयी मरण

ही बातमी आग्र्यातील ब्रिटिश सेनापति ले. ग्रॅण्ड याला कळली. तो तातडीने जगदीशपुरावर चालून आला व त्याने कुमारसिंगाच्या सैन्यावर तोफांचा मारा सुरू केला. कुमारसिंगाजवळ तोफा नव्हत्या, तरी त्याने ग्रॅण्डचा हल्ला परतवून लावला व त्याच्या घोडेस्वारांनी ब्रिटिश फौजेची लांडगेतोड सुरू केली. ब्रिटिशांना पळता भुई थोडी झाली. त्यांच्या जखमी सैनिकांना उचलून नेण्यासाठी सोळा हत्ती वापरण्यात आले. त्यांच्या तोफा देखील कुमारसिंगाच्या हाती लागल्या.

राजधानीवरचा हल्ला परतवून लावल्यावर कुमारसिंग परतला पण त्याच्या मनगटावर झालेली जखम विषारी ठरली. शेवटच्या विजयानंतर तीन दिवसांनी तो इहलोक सोडून गेला. कुमारसिंग जिवन्त असेपर्यंत ब्रिटिशांना त्याचा पराभव करता आला नाही. ऐंशी वर्षांच्या या राजपूत वीराने जेता म्हणून जगाचा निरोप घेतला.

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

मजुमदारासारखे करण्टे लेखक, सत्तावनचा उठाव ललाटी अपयश घेऊनच जन्माला आला, the fight was hopeless from the very beginnig असे म्हणतात. जे घडले तेच घडणे अपरिहार्य होते असे म्हणून शहाणपणा पदरी घेणे फारच सोपे आहे. मजुमदारांना इंग्रज कितीही अजिंक्य वाटत असले तरी सत्तावन साली थोडक्यात निभावली, दैवाने थोडी जरी साथ सोडली असती तरी भारतातून अपमानास्पद रीतीने आपली हकालपट्टी झाली असती असे इंग्रज लेखक कबूल करतात. क्रान्ति फसण्याचे मुख्य कारणही त्यांच्या मते हेच होते की गुरखे शीख वगैरे अनेक भारतीय लोक देशाचा द्रोह करून परकीय सत्तेला मदत करीत होते. रसेल म्हणतो : It must be admitted that the British would have been exterminates if the natives had been all hostile to them. Our siege of Delhi would have been quite impossible if the Sikhs had not joined our battalions, इंग्रजांचे सामर्थ्य केवढेही असो. आमच्या पराभवाचे कारण आमचा देशद्रोह हेच होते.








अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

डॉ. के. वा. आपटे

# भगवद्गीता मोक्षमार्गाचे विवेचन : ४ :

## भक्तियोग

भारतात प्रचलित असलेल्या भक्तियोगाचे मूळ ऋग्वेदात सापडते. जुन्या उपनिषदांपैकी कठ व श्वेताश्वतर यांमध्ये भक्तीचे निर्देश आढळून येतात. त्यानंतर मोक्षमार्ग या दृष्टीने भक्तियोगाला एक स्वतंत्र स्थान प्राप्त झाले; आणि ते आजतागायत या ना त्या स्वरूपात टिकून राहिलेले आहे. तेव्हा काही युरोपियन पंडितांनी म्हटल्याप्रमाणे भगवद्गीतेला भक्तियोग हा ख्रिश्चनधर्मातून आलेला नसून, त्याच्यामागे ऋग्वेदापर्यंत पोचणारी पूर्वपीठिका आहे.

ऋग्वेद आणि जुनी उपनिषदे यात आढळून येणारी भक्ति आणि पुढे उत्तरकालात विकसित स्वरूपात आढळणारी नवविधा भक्ति या दोहोंच्या मध्ये भगवद्गीतेतील भक्ति आहे. म्हणूनच उत्तरकालीन भक्तियोगशास्त्रांच्या ग्रंथात विवेचिली गेलेली नवविधा भक्ति भगवद्गीतेमध्ये स्पष्ट शब्दात मांडली गेलेली आढळत नाही; तथापि नवविधा भक्तीतील काहींचे स्पष्ट उल्लेख भगवद्गीतेत येतातच. ( हा भाग पुढे अधिक स्पष्ट केलेला आहे. )

भक्तियोगाचे पहिले गृहीत प्रमेय असे आहे की ईश्वर हे अंतिम तत्त्व आहे. आणि जग निर्माण केल्यानंतर ईश्वर विश्वापासून अलिप्त न रहाता जगाच्या कल्याणात लक्ष घालतो ( ३.२२-२४); त्यासाठी तो अवतारही[१] धारण करतो. धर्माला ग्लानि येऊन अधर्मवृद्धि झाली असल्यास ईश्वर अवतार धारण करतो; साधूंचे रक्षण, दुष्कर्मी लोकांचा नाश आणि धर्माची संस्थापना करण्यास ईश्वर अवतार घेतो (४.७-८). तेव्हा ज्याला 'श्रेयस्' प्राप्तीची इच्छा[२] असेल, त्याने ईश्वराची भक्ति करावी, हे ओघानेच येते.

---

१. अवताराच्या तपशीलासाठी पहा– के. वा. आपटे, भगवद्गीता : मानव, विभूति व अवतार, विलिंग्डोनियन. मार्च १९६९.

२. केवळ भक्तिमार्गीयांनीच भक्ति करावी असे नाही; तर इतर मार्गीयांनाही भक्ति करण्यास हरकत नाही, असे भ. गी. चे मत दिसते. उदा. ज्ञानी

अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

भक्ति कोण करीत नाही ?

या त्रिगुणात्मक जगात ईश्वर न मानणारे अनेकजण आहेत. या विश्वाचे उत्पत्तिकारण असा कोणी ईश्वर आहे आणि तो अवतार घेत असतो, हेच कित्येकांना मान्य नाही. काही अज्ञानी लोक ईश्वराचा (=कृष्णाचा) अव्यय, अत्युत्तम आणि श्रेष्ठ असा भाव जाणीत नाहीत; ईश्वराचा अवतार म्हणजे अव्यक्तातून व्यक्त स्थिति असे ते समजतात (७.२४). ईश्वर हा भूतांचा महेश्वर आहे, हा ईश्वराचा श्रेष्ठ भाव न जाणणारे मूढ लोक अवतारामध्ये मानवी देह धारण केलेल्या ईश्वराची अवहेलना करतात (अवजानन्ति मां मूढा मानुषीं तनुमाश्रितम् । परं भावमजानन्तो मम भूतमहेश्वरम् ॥ ९.११). याचे कारण असे की त्यांनी मोहकारक अशा राक्षसी आणि आसुरी प्रकृतीचा– स्वभावाचा– आश्रय घेतलेला आहे. (राक्षसीमासुरीं चैव प्रकृतिं मोहिनीं श्रिताः । ९.१२). अवताररूपातसुद्धा ईश्वर स्वतःच्या योगमायेने युक्त असल्यामुळे, सर्वच जणांना ईश्वराचे रूप स्पष्टपणे कळत नाही; म्हणून ईश्वर हा अज आणि अव्यय आहे, हे मूढ जनांना उमगतच नाही (७.२५). या भूतलावरील ईश्वराचा प्रत्यक्ष अवतार जाणण्यास जर सामान्य जन असमर्थ असतात, तर जगच्चालक म्हणून कोणी ईश्वर आहे, हे जाणण्यास ते कसे समर्थ होतील ? त्यामुळे होते ते असे :– दुष्कर्म करणारे मूढ असे नराधम ईश्वराला शरण जात नाहीत. कारण मायेने त्यांच्या ज्ञानाचा अपहार केलेला आहे आणि त्या लोकांनी आसुरी भावाचा आश्रय घेतलेला आहे (न मां दुष्कृतिनो मूढाः प्रपद्यन्ते नराधमाः । माययापहृतज्ञाना आसुरं भावमाश्रिताः ॥ ७.१५). इच्छा आणि द्वेष यांतून उत्पन्न होणाऱ्या द्वंद्वमोहाने सर्व भूते संमोहित होतात आणि त्यांतील कोणीही ईश्वराला जाणीत नाही (७.२६–२७). या जगातील त्रिगुणात्मक वस्तूंनी मोहित झालेले लोक गुणांच्या पलीकडे ईश्वर म्हणून कोणीतरी आहे आणि तो त्यांच्यापेक्षा श्रेष्ठ आहे. हे जाणत नाहीत (त्रिभिर्गुणमयैर्भावैरेभिः सर्वमिदं

भक्त हा ईश्वराचा आत्मा आहे (७.१८) आणि अनेक जन्मांच्या शेवटी तो ईश्वराप्रत जातो (७.१९) तसेच, ४.१०; १८.५४-५५ पहा. ईश्वरावर भार घालून कर्मे करणारासुद्धा ईश्वराच्या प्रसादाने शाश्वत आणि अव्यय असे पद म्हणजे मोक्षपद मिळवितो (१८.५६). योगाच्या अभ्यासकाने ईश्वरपर व ईश्वरचित्त असावे (६.१४); योगीभक्त हा चांगला आहे (६.४७); तसेच ६.२९-३१ पहा.

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

जगत् । मोहितं नाभिजानाति मामेभ्यः परमव्ययम् ॥ ७·१३ ). आसुरी संपत्तीने युक्त माणसे तर जग अनीश्वरच आहे असे म्हणतात ( जगदाहुरनीश्वरम् । १६.८ ) आणि त्यामुळे अहंकार, बल,[३] दर्प, काम, क्रोध यांचा आश्रय घेऊन, ते मत्सरी लोक[३] स्वतःच्या व इतरांच्या शरीरात असणाऱ्या ईश्वराचा द्वेष करतात ( १६·१८ ) आणि आसुरी योनीत जन्माला आलेले हे मूढ लोक ईश्वरप्राप्ति न होता अधम गतीला जातात. ( १६·२० )

## भक्तीची आवश्यकता

तेव्हा राक्षसी व आसुरी प्रकृतीचा त्याग करून, इच्छा आणि द्वेष यांना बाजूला सारून, त्रिगुणांनी मोहित न होता, ईश्वर आहेच हा विश्वास बाळगून ईश्वरभक्तीला लागले पाहिजे, हे ओघानेच येते. निराळ्या शब्दांत सांगायचे झाल्यास, दैवी प्रकृतीचा आश्रय घेतलेले महात्मे मात्र ईश्वर हा अनादी आणि अव्यय आहे हे जाणून त्याची भक्ती करतात ( महात्मानस्तु मां पार्थ दैवीं प्रकृतिमाश्रिताः । भजन्त्यनन्यमनसो ज्ञात्वा भूतादिमव्ययम् ॥ ९.१३ ).

जीव हा ईश्वराचा अंश आहे ( १५.७ ); तेव्हा जीवाने ईश्वरप्राप्तीची इच्छा करावी हे योग्यच आहे; आणि त्या ईश्वरप्राप्तीसाठी भक्ति उपयुक्त आहे ( ८.२२; ११.५४ ). अनित्य आणि सुखरहित अशा या मृत्युलोकात जन्म प्राप्त झाला असता, ईश्वराची भक्ति करावी (अनित्यमसुखं लोकमिमं प्राप्य भजस्व माम् । ९.३३ ); तेच श्रेयस्कर आहे. जगातल्या त्रिगुणात्मक वस्तु माणसाला मोहात पाडतात, हे खरे; ईश्वराची दैवी गुणमयी माया तरून जाण्यास कठीण आहे, हेही सत्य आहे; पण जे ईश्वराला शरण जातात, ते ही माया तरून जातात हेही खरे आहे ( ७.१४ ). गुणांचे पलीकडे जाण्यास भक्ति उपयोगी आहे: जो अव्यभिचारी अशा भक्तीने ईश्वराची सेवा किंवा उपासना करतो तो गुणांचे पलिकडे जाऊन 'ब्रह्मभूयाय कल्पते' ( १४.२६ ). ईश्वराच्या विश्वरूप दर्शनाची इच्छा असेल तर या कामी केवळ भक्ति हीच उपयुक्त आहे; आणि भक्तीने ईश्वराला जाणून ईश्वरात प्रवेश करता येतो ( ११.५४ ). जो हे सर्व जगत् व्यापून आहे व ज्याच्या ठिकाणी ही सर्व भूते आहेत असा तो परम पुरुष म्हणजे ईश्वर केवळ अनन्य अशा भक्तीनेच प्राप्त होतो ( पुरुषः स परः पार्थ भक्त्या लभ्यस्त्वनन्यया । यस्यान्तःस्थानि भूतानि येन सर्वमिदं ततम् ॥ ८.२२).

३. अशा लोकांना ईश्वर आसुरी योनीतच फेकतो. ( १६.१९ ).

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

## भक्तीचा अधिकारी कोण ?

वरवर पाहिले तर असे वाटते की कुणीही भक्ति करू शकेल, असे भगवद्‌गीतेचे मत आहे. उदा–ईश्वराचा आश्रय घेऊन व भक्ति करून पापयोनीत जन्माला आलेले, स्त्रिया, वैश्य, तसेच शूद्र हेसुद्धा परम गतीला– मोक्षाला– जातात. (९.३२) मग ब्राह्मण व राजर्षि यांचेबद्दल काय सांगावे ? (९.३३) (पूर्वी) दुराचारी[4] असणारा (पण आता दुराचाराचा त्याग करून) ईश्वराची भक्ति करणारा जो कोणी असेल त्याला साधुच समजावे (९.३०); आणि भक्तीच्या योगाने तो लौकरच धर्मात्मा होऊन, शश्वत् शांति– मुक्ति– प्राप्त करून घेतो ( ९.३१ ).

पण सूक्ष्म दृष्टीने पाहिले तर असे आढळते की उपर्युक्त भागात सुद्धा भक्ति करणाऱ्याची काही विशिष्ट पात्रता गृहीत धरलेली आहेच. सामान्यतः भक्तीला जी एक पूर्वसिद्धता लागते, ती भगवद्‌गीतेने पुढीलप्रमाणे दिलेली आहे :– पापाचार टाकून भक्ति करावयाची आहे. ज्यांचे पाप लयाला गेले आहे म्हणजे ज्यांनी पाप करण्याचे सोडून दिले आहे, आणि जे पुण्य कर्मे आचरीत आहेत, ते लोक द्वंद्वमोहातून सुटून, दृढव्रत धारण करून, ईश्वराची भक्ति करतात ( येषां त्वन्तगतं पापं जनानां पुण्यकर्मणाम्। ते द्वंद्वमोहनिर्मुक्ता भजन्ते मां दृढव्रताः ॥ ७.२८ ). सर्वस्य चाहं हृदि संनिविष्टो ... प्रथितः पुरुषोत्तमः ( १५.१५–१८ ) या श्लोकांत सांगितल्याप्रमाणे ईश्वराचे स्वरूप आहे, हे जो जाणतो तो ईश्वराच्या भक्तीला लागतो ( १५.१९), ईश्वर हा सर्वांचे मूळ आहे; ईश्वरापासून सर्वांचा उगम आहे; हे जाणून भक्तीने युक्त असे शहाणे लोक ईश्वराचा आश्रय घेतात ( अहं सर्वस्य प्रभवः मत्तः सर्वं प्रवर्तते। इति मत्वा भजन्ते मां बुधा भावसमन्विताः॥ १०.८ ) वेगळ्या शब्दांत सांगायचे झाल्यास, ईश्वरावर[5] श्रद्धा हवी. माणूस हा श्रद्धामय आहे ( १७.३ ). श्रद्धा नसताना केलेल्या गोष्टी या जगात तसेच परलोकात[6] वाया

४. पहा :— के. वा. आपटे, अपि चेत् सुदुराचारः। जीवनविकास मे, १९६५.

५. सात्विक्, राजस व तामस अशी त्रिविध श्रद्धा भगवद्‌गीतेने सांगितली आहे ( १७.२ ), या तीनही श्रद्धा परमोच्च ईश्वराशी निगडित नसल्यामे त्याज्य आहेत ( १७.४ ). तर केवळ जगत्कर्त्या अशा परमेश्वरावरच श्रद्धा आवश्यक आहे.

६. अश्रद्धया हुतं दत्तं तपस्तप्तं कृतं च यत्।
असदित्युच्यते पार्थ न च तत् प्रेत्य नो इह॥ १७.२८.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

जातात. त्यामुळेच, ईश्वर हा सर्वश्रेष्ठ आहे आणि त्याला प्राप्त करून घेण्याचा भक्ति हा मार्ग आहे, ह्या ' राजविद्या– राजगुह्या 'वर जर एखाद्याचा विश्वास नसेल, तर तो ईश्वराप्रत न जाता, याच मृत्युयुक्त संसारात[7] परत येतो. तसेच, भक्त हा ईश्वरावलंबी हवा ( जरामरणमोक्षाय मामाश्रित्य यतन्ति ये । ७.२९ ). त्याचप्रमाणे, भक्ति करणाऱ्याला इंद्रियसंयमाचीही आवश्यकता आहे :– इंद्रिये ही क्षोभकारक आहेत ( इन्द्रियाणि प्रमाथीनि हरन्ति प्रसभं मनः । २.६० ). म्हणून इंद्रियांचे नियमन करून आणि मनाचा संयम करून, भक्ताने ईश्वरचित्त असणे आवश्यक आहे ( मनः संयम्य मच्चित्तो युक्त आसीत मत्परः । ६.१४ ). अशाप्रकारची पूर्वसिद्धता असल्यावर भक्तियोग जमतो असे म्हणण्यास हरकत नाही.

## ईश्वराची भक्ति कशी करावी ?

भक्ति[8] कशी करावी हे भगवद्‌गीतेने पुढीलप्रमाणे सांगितले आहे:–(श्रवण)- ईश्वराचे ठिकाणी चित्त ठेवून, ईश्वराला प्राण अर्पण करून, परस्परांना बोध करीत, नित्य ईश्वराच्या गोष्टी करीत, ईश्वराचे भक्त रमतात आणि संतुष्ट होतात ( १०.९ ) ( येथे श्रवणभक्तीचा ओझरता निर्देश आहे, असे म्हणता येईल ). ( कीर्तन :– ) प्रयत्नपूर्वक दृढ व्रत धारण करून, नित्य ईश्वरपर असे भक्त ईश्वराचे सतत कीर्तन करतात ( सततं कीर्तयन्तो मां यतन्तश्च दृढव्रताः । नमस्यन्तश्च मां भक्त्या नित्ययुक्ता उपासते ॥ ९.१४ ); भक्त ईश्वराच्या गोष्टी करीत रमतात ( कथयन्तश्च मां नित्यं तुष्यन्ति च रमन्ति च । १०.९ ). ( स्मरण वा चिंतन :– ) सदा सर्वकाळ ईश्वराचे स्मरण करावे; अनन्य मनाने जो नित्य ईश्वराचे स्मरण करतो. त्याला ईश्वर सुलभ आहे ( अनन्यचेताः यो मां स्मरति नित्यशः । तस्याहं सुलभः पार्थ नित्ययुक्तस्य योगिनः ॥ ८.१४ ) अनन्यपणे ईश्वराचे चिंतन करीत ईश्वराची उपासना करावयाची आहे ( अनन्याश्चिन्तयन्तो मां ये जनाः पर्युपासते । ९.२२ ).

---

७. अश्रद्दधानाः पुरुषा धर्मस्यास्य परंतप ।
अप्राप्य मां निवर्तन्ते मृत्युसंसारवर्त्मनि ॥ ९.३.

८. उत्तरकालीन ग्रंथात निर्दिष्ट असणारी नवविधा भक्ति अशी :--
श्रवणं कीर्तनं विष्णोः स्मरणं पादसेवनम् ।
अर्चनं वन्दनं दास्यं सख्यमात्मनिवेदनम् ॥



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनन्य चित्ताने ईश्वराचे चिंतन करणारा[९] परम पुरुषाप्रत-ईश्वराप्रत-जातो. (पादसेवनः- ) भगवद्गीतेत ईश्वरसेवेचा प्रत्यक्ष निर्देश नाही; तरी ईश्वरासाठी कर्मे करावी, इत्यादि विधानात सेवा अभिप्रेत आहे, असे म्हणण्यास हरकत नाही. उदा. - भक्त जे जे करतो, खातो, यजन करतो, देतो, तप करतो,[१०] ते ते त्याने ईश्वराला अर्पण करावे ( यत्करोषि यदश्नासि यज्जुहोषि ददासि यत् । यत् तपस्यसि कौन्तेय तत् कुरुष्व मदर्पणम् ॥ ९.२७). ईश्वराच्या भक्ताने संग सोडून, सर्व भूतांचे ठिकाणी निर्वैर होऊन, ईश्वराला परम मानून, ईश्वरासाठी कर्मे करावीत; असे करणारा भक्त ईश्वराकडे जातो ( ११.५५ ); सर्व कर्मे ईश्वरार्पण करावीत ( १२.६-७ ); मनाने सर्व कर्मे ईश्वराला अर्पण करून सतत ईश्वरचित्त असावे ( १८.५७ ); ( अर्चन :- ) काहीजण एकत्वाने किंवा पृथक्त्वाने, ज्ञानयज्ञाने पूजा करून, विश्वतोमुख ईश्वराची उपासना करतात ( ९.१५ ). ईश्वराची पूजा करावी ( ९.३४ ); ईश्वराची पूजा करून ईश्वराचा भक्त व्हावे ( १८.६५ ). शुद्ध-चित्त असा जो कोणी माणूस भक्तीने ईश्वराला पत्र, पुष्प, फळ वा पाणी अर्पण करतो त्याचे ईश्वर सेवन करतो ( ९.२६ ). प्राणसुद्धा ईश्वराला अर्पण करावा ( मद्गतप्राणाः । १०.९ ). स्वकर्माने ईश्वराची पूजा करून मानव सिद्धी प्राप्त करून घेतो ( स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिद्धिं विन्दति मानवः : १८.४६ ) ( वन्दन :- ) भक्त ईश्वराला नमस्कार करतात ( नमस्यन्तश्च माम् । ९.१४ ). ईश्वरालाच नमस्कार करावा ( मां नमस्कुरु । ९.३४ ). ईश्वराला नमस्कार करून ईश्वराचा भक्त व्हावे ( १८.६५ ). ( दास्य :-[११] ) ईश्वराला अंतिम आश्रय मानून, ईश्वराला मन देऊन, ईश्वराचा भक्त व्हावे ( ९.३४; १८.६५ ). भक्त स्वतःचे चित्त ईश्वराला देतात ( १०.९ ). ईश्वराचे ठिकाणी मन व बुद्धी ठेवावी ( १२.६-८ ) नेहमी ईश्वरचित्त असावे (मच्चित्तः सततं भव । १८.५७ ). जे ईश्वराचे ऐकत नाहीत ते अडाणी आहेत; ईश्वराच्या भक्तांनी ईश्वराचे ऐकले पाहिजे; तसे न केल्यास त्यांचा नाश होईल

---

९. अभ्यासयोगयुक्तेन चेतसा नान्यगामिना ।
परमं पुरुषं दिव्यं याति पार्थानुचिन्तयन् ॥ ८.८

१०. असे केल्याने कर्मबंधनातून सुटका होते ( ९.२८ ).

११. ईश्वराला मन, चित्त, बुद्धि, प्राण अर्पण करणे म्हणजे त्याचे दास्य करणेच होय.

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

( ३.३२; १८.५८ ). शरणागती — ईश्वराला अनन्यभावाने शरण गेले पाहिजे. सर्वांच्या हृदयात ईश्वर आहे ( १८.६१ ); त्याला सर्वभावाने शरण जावे ( तमेव शरणं गच्छ सर्वभावेन भारत। १८.६२ ). सर्व धर्मांचा त्याग करून ईश्वराला शरण जावे; तोच सर्व पापांतून[१२] मुक्तता करील.

भक्तीने मुक्ति

भक्तीचे साहाय्याने एकदा ईश्वराजवळ गेले की पुनर्जन्म नाही. परम सिद्धि प्राप्त झालेले महात्मे एकदा ईश्वराजवळ पोचले की मग त्यांना पुनर्जन्म नाही. (८.१५–१६). ईश्वराची भक्ति करून भक्त निःसंशयपणे ईश्वराप्रत जातो. (भक्ति मयि परां कृत्वा मामेवैष्यत्यसंशयः। १८.६८; तसेच ८.७, १८.६५ पहा). ईश्वराचे ठिकाणी मन आणि बुद्धि ठेवणारा भक्त मरणोत्तर निःसंशयपणे ईश्वराचे ठिकाणी राहील ( मय्येव मन आधत्स्व मयि बुद्धिं निवेशय। निवसिष्यसि मय्येव अत ऊर्ध्वं न संशयः॥ १२.८ ).

अंतकाळी ईश्वरस्मरण

ॐ या एकाक्षर ब्रह्माचा उच्चार करीत व ईश्वराचे स्मरण करीत जो देह सोडतो, तो परमगतीला–मोक्षगतीला–जातो ( ८.१३ ). प्रयाणकाळी, अचल मनाने, भक्तीने व योगबलाने जो कोणी भ्रूमध्यात प्राण आणून परम पुरुषाचे स्मरण करतो, तो त्या दिव्य, परम, पुरुषाजवळ जातो ( ८.९-१० ). अंतकाळी ईश्वराचे स्मरण करीत जो देहत्याग करतो, तो ईश्वरभाव[१३] प्राप्त करून घेतो, यात शंका[१४] नाही.

इतर देवतांचे भक्त

असे असले तरी, सर्वच जण सर्वोच्च ईश्वराची भक्ति करतात असे नाही. या जगात गौण देव–देवतांची भक्ति करणारे लोक आढळतातच. या भक्तांचे

१२. सर्वधर्मान् परित्यज्य मामेकं शरणं व्रज।
अहं त्वा सर्वपापेभ्यो मोक्षयिष्यामि मा शुचः॥ १८.६६.

१३. कारण-- यं यं वापि स्मरन् भावं त्यजत्यन्ते कलेवरम्।
तं तमेवैति कौन्तेय सदा तद्भावभावितः॥ ८.६.

१४. अन्तकाले च मामेव स्मरन् मुक्त्वा कलेवरम्।
यः प्रयाति स मद्भावं याति नास्त्यत्र संशयः॥ ८.५

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

संदर्भात भगवद्गीता सांगते:-स्वतःच्या प्रकृतीने नियंत्रित असलेले लोक ( अमुक देवतेसाठी आवश्यक असे ) ते ते नियम पाळून, त्या त्या इच्छांमुळे लुप्तज्ञान होऊन, (मुख्य ईश्वराला दुर्लक्षून) अन्य देवतांना शरण जातात (७.२०)· तरी जो जो भक्त ज्या ज्या देवतेची श्रद्धेने अर्चना करू इच्छितो, त्याची ती श्रद्धा सर्वोच्च ईश्वरच निश्चल करतो (७.२१). मग त्या निश्चल श्रद्धेने युक्त होऊन तो भक्त त्या देवतेचे आराधन करतो; परिणामी त्याच्या इच्छा पूर्ण होतात; पण त्या इच्छा खरे म्हणजे मुख्य ईश्वरानेच पूर्ण केलेल्या असतात ( ७.२२ ). पण त्या अल्पबुद्धि भक्तांना मिळणारे ते फळ मात्र अल्पजीवी-नश्वर-असते ( अन्तवत् तु फलं तेषां तद्भवत्यल्पमेधसाम् । ७.२३ ).

गौण देवांसाठी व्रते वा पूजा[१५] करणारे त्या गौणदेवाप्रत जातात ( देवान् देवयजो यान्ति । ७.२३; यान्ति देवव्रतादेवान् । ९.२५ ).

खरे पाहिले तर अन्य देवतांची पूजा करणारे श्रद्धायुक्त लोक हे ईश्वराचीच उपासना करतात ( कारण ईश्वरच सर्व यज्ञांचा (= उपासना, पूजा ) भोक्ता आणि प्रभु आहे-९.२४ ); पण ही उपासना होते मात्र अविधिपूर्वक आणि अप्रत्यक्षपणे. आणि हे लोक सर्वश्रेष्ठ ईश्वराला जाणीत नसल्याने, ते तत्त्वच्युत होतात ( ९.२३-२४ ).

## ईश्वर आणि भक्त

म्हणून परमोच्च ईश्वराची भक्ति करावी. कारण ईश्वराची पूजा करणारे ईश्वराप्रत जातात ( यान्ति मद्याजिनोऽपि माम् । ९.२५ ). ईश्वराचे भक्त ईश्वराकडे जातात ( मद्भक्ता यान्ति मामपि । ७.२३ ).

ईश्वराची उपासना करणारे पुण्यवान् लोक हे आर्त, जिज्ञासु, अर्थार्थी व ज्ञानी[१६] या प्रकारे चार प्रकारचे[१७] असू शकतात ( ७.१७ ).

ज्याचे चित्त ईश्वराचे ठिकाणी आहे, तो ईश्वराच्या प्रसादाने सर्व संकटातून पार पडतो ( मच्चित्तः सर्वदुर्गाणि मत्प्रसादात् तरिष्यसि । १८.५८). जे ईश्वरपर असे भक्त आहेत, त्यांचा योगक्षेम ईश्वर वहातो ( तेषां नित्याभि-

---

१५. तसेच :-- पितॄन् यान्ति पितृव्रताः । भूतानि यान्ति भूतेज्याः । ९.२५.

१६. ज्ञानी भक्त ईश्वराला प्रिय आहे; तो ईश्वराचा आत्मा आहे. (७.१७-१८).

१७. जे जसे ईश्वराकडे येतात तशी ईश्वर त्यांची संभावना करतो (४.११).



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

युक्तानां योगक्षेमं वहाम्यहम् । ९.२२ ). ईश्वराचा भक्त हा कधीही नाश पावत नाही ( न मे भक्तः प्रणश्यति । ९.३१ ).

ईश्वराचा आश्रय घेऊन, जरा आणि मरण यातून सुटण्यासाठी जे प्रयत्न करतात, ते ब्रह्म, सर्व कर्म आणि अध्यात्म[१८] जाणतात. भक्ति करणाऱ्यांना ईश्वर असा बुद्धियोग देतो की ज्यामुळे ते ईश्वराजवळ जातात ( तेषां सततयुक्तानां भजतां प्रीतिपूर्वकम् । ददामि बुद्धियोगं तं येन मामुपयान्ति ते ॥ १०.१० ). भक्तांवर अनुकंपा करून, तेजस्वी अशा ज्ञानरूपी दीपाने ईश्वर त्यांच्या अज्ञानरूपी अंधकाराचा[१९] नाश करतो.

ईश्वरपर असे जे भक्त[२०] सर्व कर्मे ईश्वराला अर्पण करून, अनन्य भक्तीने ईश्वराचे ध्यान करीत, उपासना करतात, त्या ईश्वरचित्त भक्तांचा ईश्वर लौकरच या मृत्युयुक्त संसार-सागरातून उद्धार करतो ( १२.६–७ ). द्वेषाचा अभाव, सर्वभूतांशी मैत्री, इत्यादि, गुण असणारा भक्त ईश्वराला प्रिय असतो ( १२.१३-१९ ).

ईश्वराच्या प्रसादाने भक्ताला पराशांति आणि शाश्वत स्थान ( म्हणजे मोक्ष ) प्राप्त होते ( तत्प्रसादात् परां शान्तिं स्थानं प्राप्स्यसि शाश्वतम् ॥ १८.६२ ).



१८. जरामरणमोक्षाय मामाश्रित्य यतन्ति ये ।
ते ब्रह्म तद्विदुः कृत्स्नमध्यात्मं कर्म चाखिलम् ॥ ७.२९

१९. तेषामेवानुकम्पार्थमहमज्ञानजं तमः ।
नाशयाम्यात्मभावस्थो ज्ञानदीपेन भास्वता ॥ १०.११

२० जे भक्तीने ईश्वराचा आश्रय घेतात, त्यांचे ठायी ईश्वर असतो आणि ते ईश्वराचे ठिकाणी असतात ( ९.२९ ).



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

प्रा. शंकर लक्ष्मण चोरघडे.

# चंद्र

अगणित आकाशस्थ ज्योतींपैकी चंद्र हा पृथ्वीचा निकटतम शेजारी आहे. पृथ्वी सूर्याभोवती फिरते, चंद्र पृथ्वीभोवती फिरतो. पृथ्वीला ग्रह म्हणतात, चंद्राला उपग्रह म्हणतात.

भारतात चंद्राला सोम, सुधाकर, शशी, निशिकांत, यासारखी अनेक नावे आहेत. चंद्र हा सूर्याबरोबरीचा देव समजला जातो. आदिदेव शंकराने तर चंद्राला मस्तकी धारण केले आहे.

दधिशंखतुषाराभं क्षीरोदार्णव संभवम् ।
नमामि शशिनं सोमं शंभोर्मुकुटभूषणम् ।।

– हा श्लोक म्हणून आपण चंद्राची प्रार्थना करतो. चंद्र हा सूर्याबरोबर निर्माण केला गेला असे पुराणांत म्हटले आहे. सूर्य जसा दिवसाचा सम्राट तसा चंद्र रात्रीचा सम्राट समजला जातो. गद्य, पद्य व नाटच वाङमयात चंद्राला अत्यंत महत्त्वाचे स्थान आहे. चंद्राचा शीतल प्रकाश मानवी शरीराला सुखवितो, मनाला शांती देतो, प्रेमसागराला चंद्रसान्निध्यात उधाण येते असे म्हणतात. चंद्राला साक्ष ठेवून प्रेमाच्या आणाभाका घेतल्या जातात. सुंदर स्त्रीला चंद्रमुखी म्हणून संबोधण्यात येते. पुरेसे चंद्रबळ असल्याशिवाय स्त्रीपुरुषांची लग्ने सुद्धा होत नाहीत म्हणे, चंद्राला लागणारी ग्रहणे अशुभ-सूचक असतात, चंद्र मानवी मन नियंत्रित करतो, कोजागिरी पौर्णिमेचा चंद्र अमृताचा वर्षाव करतो, गणेशचतुर्थीला चंद्रदर्शन घडले तर चोरीचा आळ येतो, पौर्णिमेच्या सुमारास मानवी मनाचा तोल कोलमडतो, लैंगिक व सामाजिक गुन्हेगारीचे प्रमाण वाढते, काही रोपे फक्त अमावास्येला किंवा फक्त पौर्णिमेला लावली तरच वाढतात व पूर्ण विकसित फळे धारण करतात, चंद्रामुळे हवामानावर परिणाम होतात, पर्जन्यवृष्टियोग चंद्रावर अवलंबून असतात, यांसारख्या चंद्राबद्दल बऱ्यावाईट, खऱ्याखोटचा, अर्धसत्य, काल्पनिक, समजुती प्रचारात आहेत.

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

शास्त्रज्ञांच्या दृष्टीतून चंद्राचे स्वरूप अतिशय भिन्न प्रकारचे आहे. कसे ते आता पाहू या :

चंद्राचे वय ४ अब्ज ६० कोटी वर्षे आहे. पृथ्वीपासून चंद्र दोन लक्ष एकोणचाळीस हजार ( २,३९,००० ) मैल किंवा तीन लक्ष ऐंशी हजार ( ३,८०,००० ) किलोमीटर दूर आहे. चंद्राचा व्यास २१६० मैल किंवा ३४७६ किलोमीटर आहे. चंद्राचे द्रव्यमान त्र्याहात्तर पूर्णांक एकोणपन्नासांश गुणिले दहाचा चोविसावा घात ( $७३.४९ \times १०^{२४}$ ) ग्रॅमइतके आहे. चंद्राची माध्य घनता ( दाढर्य ) दर घन सेंटिमीटरला तीन पूर्णांक चौतीस शतांश ग्रॅम ( ३.३४ ग्रॅ. / सेंमी. ) अशी आहे. माध्य पृष्ठीय गुरुत्वाकर्षण सेकंदाच्या वर्गा-गणिक एकशेबासष्ट सेंटिमीटर ( १६२ सेंमी. / $सेकंद^{२}$ ) आहे. चांद्रगुरुत्वाकर्षणा-पासून मुक्त होऊन अवकाशात निसटण्यासाठी आवश्यक असणारा चांद्रपृष्ठीय मुक्तिवेग प्रतिसेकंदास दोन पूर्णांक अडतीस शतांश ( २·३८ ) किलोमीटर आहे.

चंद्राच्या ह्या अभिलक्षणांची पृथ्वीच्या अभिलक्षणांशी तुलना केल्यास असे दिसून येते की पृथ्वीच्या मानाने चंद्राचा व्यास पावपट आहे, चंद्राचा पृष्ठभाग एकचौदांश ( $\frac{१}{१४}$ ), आकारमान एक एकोणपन्नासांश ( $\frac{१}{४९}$ ) आहे. चंद्राच्या पृष्ठभागाचे क्षेत्रफळ आफिरकाखंडाएवढे आहे. चंद्राचे द्रव्यमान पृथ्वीच्या द्रव्यमानाच्या सुमारे एक एक्यांशी पूर्णांक तीन दशांशांश ( $\frac{१}{८१·३०१}$ ) म्हणजे जवळजवळ एक शतांश आहे. चंद्राची माध्य घनता पृथ्वीच्या घनतेच्या सहाशेचारसहस्रांश ( ०·६०४ ) आहे. चंद्राचे गुरुत्वाकर्षण पृथ्वीच्या गुरुत्वा-कर्षणाच्या एकशेपासष्टसहस्रांश ( ०·१६५ ) म्हणजे जवळ जवळ $\frac{१}{६}$ आहे. चंद्राच्या पृष्ठावरील मुक्तिवेग पृथ्वीपृष्ठावरील मुक्तिवेगाच्या दोनशेतेरासहस्रांश ( ०·२१३ ) म्हणजे सुमारे $\frac{१}{५}$ आहे.

सूर्यमालेतील ३१ ज्ञात उपग्रहांत प्राथमिक किंवा आद्य ग्रहाच्या विविध प्रचलांशी तुलना केल्यास चंद्र हा सर्वांत मोठा उपग्रह ठरतो.

पृथ्वीवर ६० किलोग्रॅम वजन असलेला माणूस चंद्रावर फक्त दहा ( १० ) किलोग्रॅम वजनाचा भरतो. पृथ्वीवरील माणूस विशिष्ट अवसान अंगी आणून जितकी उंच उडी मारू शकतो, त्यापेक्षा ६ पट उंच उडी मनुष्य चंद्रावर गेला तर तेवढेच अवसान आणून मारू शकतो. चांद्रपृष्ठावर मनुष्य ३० फूट उंच उडी सहजासहजी मारू शकेल. चंद्र पृथ्वीला जेवढ्या प्रेरणेने ओढू शकतो



मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

त्याच्या ८० पट प्रेरणेने पृथ्वी चंद्राला आपल्याकडे ओढते. चंद्रावर पाणी नसल्यामुळे समुद्र भरती–ओहोटीच्या स्वरूपात या प्रेरणेचा परिणाम आपल्याला दिसू शकत नाही. पण तीमुळे चंद्राचा व्यास क्रमाक्रमाने निश्चितपणे बदलतो.

चंद्र त्याच्या आसावर जेवढ्या काळात परिवलन करतो, तेवढ्याच काळात तो पृथ्वीभोवती नक्षत्र-परिभ्रमण करतो. हा काल सुमारे २७$\frac{1}{3}$ दिवसांचा म्हणजे २७ दिवस ७ तास ४३ मिनिटे ११.६ सेकंदांचा असतो. ह्या कारणामुळे चंद्राची एकच बाजू आपणास पृथ्वीवरून दिसते. चंद्र विमध्यमी ( विकेंद्री ) कक्षेत फिरतो. परिभ्रमण करताना चंद्र मागेपुढे हलतो. पृथ्वीच्या गुरुत्वाकर्षणामुळे व परिवलनामुळेही चंद्राचे अक्षदोलन होते. चंद्राचा भासमान व्यास व पृथ्वीपासूनचे चंद्राचे अंतर सारखे बदलत असते. चंद्र पृथ्वीपासून दूरतम असताना तो २,५२,७१० मैल अंतरावर असतो; निकटतम असताना पृथ्वी व चंद्र यामधील अंतर २,२१.४६३ मैल असते. ह्या सर्वांचा परिणाम म्हणजे चंद्राचा एकंदर ५९ टक्के भाग दृश्यमान होतो. चंद्राच्या मागील ४१ टक्के भाग कधीच आपल्या दृष्टीला पडत नाही. तथापि मानवरहित अवकाशयानांनी व चंद्राभोवती परिभ्रमण करणाऱ्या अंतराळवीरांनी घेतलेल्या छायाचित्रांमुळे चंद्राच्या उर्वरित ४१ टक्के अदृश्य भागाचेही आपल्याला दर्शन घडले आहे. चंद्राच्या दृश्य व अदृश्य गोलार्धात खूपच साम्य आहे.

सापेक्ष दृष्टीने सूर्य एखाद्या ताऱ्यापासून निघाल्यानंतर पुनः त्याच ताऱ्यापर्यंत आकाशाची फेरी करून येण्याला ३६५$\frac{1}{4}$ दिवसांचा अवधी लागतो. चंद्राला अशीच फेरी पूर्ण करण्याला २७$\frac{1}{3}$ दिवसांचा काल लागतो. ह्या २७$\frac{1}{3}$ दिवसांच्या कालावधीला " नाक्षत्रमास " असे म्हणतात. चंद्राची ही गती सूर्याच्या गतीपेक्षा अधिक असल्यामुळे चंद्र सूर्याला मागे टाकून पुढे जातो व पुनः सूर्याला गाठतो. चंद्राच्या ह्या फेरीला २९$\frac{1}{2}$ दिवसांचा म्हणजे २९ दिवस १२ तास ४४ मिनिटे ३ सेकंदांचा कालावधी लागतो. ह्या कालास " सांवासिक " मास अशी संज्ञा आहे. ह्या कालातच चंद्राची स्वतःभोवती एक फेरी पूर्ण होते. त्यामुळे चंद्रावर पृथ्वीचे पंधरा दिवस चांद्रदिन व पंधरा दिवस चांद्ररात्र नांदत असते.

चंद्रावर वातावरण नाही. चांद्रपृष्ठावर वायुभार दहाचा उणे अकरावा घात ( $10^{-11}$ ) टॉरिसेलियन इतका अत्यल्प असावा असे अनुमान आहे. चंद्रावर वारा नाही, ढग नाहीत, पाऊस नाही, वादळेही नाहीत. चंद्रावर इंद्रधनुष्य नाही, ऑरोरा बोरिॲलिससारखे नयनमनोहर चित्ताकर्षक ध्रुवीय


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

प्रकाश नाहीत. पृथ्वीवरील हवामानाचे कोणतेच आविष्कार चंद्रावर प्रतीत होत नाहीत.

वातावरणाचा अभाव व दिवसरात्रीचा प्रदीर्घ कालावधी यांमुळे चांद्रतपमानात भयंकर विषमता आढळते. चंद्राच्या विषुववृत्तावर मध्यान्हीचे तपमान १२७ अंश सेल्शियस म्हणजे पाण्याच्या उकळबिंदूपेक्षाही अधिक असते, रात्रीचे तपमान उणे १९३ ते उणे १७३ सेल्शियस अंशांची अतिरेकी मर्यादा गाठते. या भागात वास्तव्य केल्यास असंरक्षित माणसाचे रक्त दिवसा उकळू लागेल, रात्री गोठून जाईल. चांद्रपृष्ठावर असंवाहक घट्ट धुळीचे आवरण असल्यामुळे पृष्ठभागापासून १ मीटर खोलीवर उणे ४३ अंश सेल्शियससारखे तपमान आढळते. चांद्रध्रुवांवर तपमान उणे १२३ अंश सेल्शियससारखे असते. वातावरण नसल्यामुळे व प्रकाशाचे प्रकीर्णन होत नसल्यामुळे चांद्रपृष्ठावरील सावल्या पृथ्वीवरील सावल्यांपेक्षा अधिक काळ्याकुट्ट असतात. गर्द छायेत कोणतीही वस्तू किंवा व्यक्ती पूर्णपणे अदृश्य होऊ शकते. चंद्रावरील छायेत तपमान अत्यंत थंड तर थोड्याच अंतरावरील प्रकाशित भागांवर ते पाण्याच्या उकळबिंदूपेक्षाही अधिक असते. तेथील सूर्यप्रकाशाची प्रभा अंधत्व आणण्याइतकी तीव्रतम असते. चंद्रावर सूर्योदय एकदमच होतो, सूर्यास्तही एकदमच होतो. सूर्यास्त झाल्यावर काही क्षणांतच तपमान २०४ सेल्शियस अंशांनी खाली येते !

चंद्राचा अंतर्गत भाग थंड व पृष्ठभाग उष्ण आहे. पृथ्वी व इतर ग्रह यांपेक्षा चंद्रावरची परिस्थिती नेमकी उलट आहे.

चंद्राचा आकार प्रतिदिनी बदलत असल्यासारखा दिसतो. शुक्लपक्षात तो कलेकलेने वाढतो, कृष्णपक्षात तो कलेकलेने कमी होतो. चंद्रोदयाच्या वेळात प्रतिदिनी ५० मिनिटांचा फरक पडत असतो. अनेकविध गतींनी चंद्र अवकाशात फिरत असतो. हॉर्वर्ड विद्यापीठातील सेसिलिया पेन-गापोश्किन नावाच्या ख्यातनाम संशोधिकेच्या अंदाजाप्रमाणे चंद्राला ८०० पेक्षा अधिक गती आहेत. चंद्र, पृथ्वी व सूर्य यांच्या सापेक्ष व परस्परावलंबित गतींमुळे चंद्र व सूर्याला ग्रहणे लागतात, समुद्रांना भरती-ओहोटी येते. दर दिवशी भरतीची वेळ ५० मिनिटांनी पुढे ढकलली जाते.

एका वर्षांतून चंद्रसूर्याची साधारणपणे ७ ग्रहणे लागू शकतात : त्यातील ५ सूर्याची व २ चंद्राची असतात. ४ सूर्याची व ३ चंद्राची ग्रहणे विरळाच.

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

गतकाळात अशी ग्रहणे इ. स. १७८७ व १९१७ साली लागली होती. भविष्य-काळात हा योग इ. स. १९८२ व २०९४ साली येणार आहे. प्रतिवर्षी ग्रहणांची संख्या ७ असतेच असे नाही. इ. स. १८०५ व १९३५ साली ७ ग्रहणे लागली होती. भविष्यकाळात असा योग इ. स. २१६० साली येणार आहे.

पृथ्वी आणि सूर्य यांच्यामधून चंद्र गेल्यामुळे चंद्राची छाया पडलेल्या भागात सूर्यग्रहण दिसते. खग्रास सूर्यग्रहणाचा दीर्घतम कालावधी ७ मिनिटे ४० सेकंदांचा असतो. अशावेळी सूर्याच्या तेजःशृंगांचा ( prominences चा) सूक्ष्म अभ्यास करणे शक्य होते. खग्रास सूर्यग्रहण हा एक अत्यंत लक्षवेधी चमत्कार आहे. ह्या वेळी अति दीप्तिमान तारे दिवसा दिसू शकतात; सौर-किरीट किंवा तेजोवलय कंटिका ( Spicules ), उज्ज्वाला व सौर उद्रेकांचा अभ्यास करणे शक्य होते. सूर्यामागील दूरस्थ ताऱ्यांपासून पृथ्वीच्या दिशेने निघालेले किरण सूर्यगोलाच्या गुरुत्वामुळे विचलित होऊ शकतात, या युगप्रवर्तक संशोधक आल्बर्ट आईन्स्टाईन यांच्या सिद्धांताला प्रायोगिक पुरावा मिळणे केवळ चंद्रामुळे सूर्याला लागलेल्या ग्रहणातच शक्य झाले !

पौर्णिमेचा चंद्र आणि सूर्य यांच्यामधून पृथ्वी जात असता ज्या क्षेत्रावर पृथ्वीची छाया चंद्रावर पडते त्या क्षेत्रात चंद्रग्रहण दिसते. खग्रास चंद्रग्रहणाचा कालावधी साधारणपणे १०० मिनिटांचा असतो. यावेळी चंद्र काळसर तांबूस रंगाच्या ताम्रवर्णी तबकडीसारखा दिसतो. चंद्रग्रहण हे जितके सुंदर तितकेच भयानक दृश्य असते.

चंद्रावरील दिवसाच्या उच्च तपमानामुळे, क्षीण गुरुत्वाकर्षणामुळे व अल्प मुक्तिवेगामुळे वातावरणातील घटक वायुकण अवकाशात निसटून गेले म्हणून चंद्राभोवती वातावरण नाही. चांद्रपृष्ठावरील खळग्यांत वायुकणांचे सूक्ष्म लेश असणे किंवा चंद्रावरील भेगात घडणाऱ्या किरणोत्सारी प्रक्रियांमुळे काही वायुकण बाहेर येणे शक्य असावे. परंतु त्यामुळे दीर्घकाळ टिकणारे वातावरण चंद्रावर निर्माण होऊ शकत नाही. चंद्रावर निश्चितपणे जलबाष्पाचा अंशही नाही. अर्थात तेथे हवामानाचे विविध प्रकार नाहीत. हिमनद्या नाहीत, आकर्षक रंगसंपदा नाही. ध्वनिलहरी चंद्रावर प्रवास करू शकत नाहीत. चंद्र हे एक जीवविहीन, स्मशानशांततामय, निष्पर्ण, ध्वनिशून्य, चैतन्यहीन मृत जगत् आहे. तेथे वनस्पती नाहीत, प्राणीही नाहीत.

चंद्राचा पृष्ठभाग खडबडीत आहे. चंद्रावर अनेक पर्वतरांगा, शिखरे, टेकड्या, दऱ्या, खोरी आहेत. काही शैलशृंगे ८ किलोमीटरांपेक्षा अधिक उंच



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

किंवा माऊंट एव्हरेस्ट एवढी उंच असावीत. शास्त्रज्ञांनी चांद्रपर्वतांना ॲपेनाईन्स्, कॉकेशियस, आल्पस् यांसारखी पृथ्वीवरील पर्वतांचीच नावे दिली आहेत. ह्या पर्वतरांगांनी ज्या विस्तीर्ण काळसर दिसणाऱ्या मैदानाला वेढले आहे त्या मैदानाला "Sea of Showers" म्हणजे "वृष्टिसागर" असे नाव दिले आहे. चंद्रावर अनेक सपाट व सखल मैदाने आहेत. त्यांना "शांतिसागर" "वादळांचा समुद्र," "मिहिकासागर", "बाष्पसागर," "शीतसागर," "अरिष्टसागर" अशी काव्यपूर्ण व कल्पकतापूर्ण नावे दिली आहेत. पण ही मैदाने समुद्र नव्हेत. त्यांत पाण्याचा लवलेशही नाही. ती उजाड विस्तीर्ण वाळवंटे आहेत! काव्याशी सर्वस्वी विसंगत असा प्रकार आहे हा!

चंद्राचा चूर्णमय पृष्ठभाग मंद रक्षावर्णाचा आहे. त्यावर १ सेंटिमीटर ते २५० किलोमीटर व्यास असलेले निरनिराळ्या आकारांचे असंख्य खाचखळगे व विवरे आहेत. ही विवरे पृथ्वीवरील ज्वालामुखींच्या विवरांसारखी दिसतात. त्यांतून कोणत्याच प्रकारचा धूर किंवा ज्वालारस बाहेर पडत नाही. शास्त्रज्ञांनी आतापर्यंत चंद्राच्या दृश्य भागावर ३०,००० ( तीस हजार ) विवरांची गणती केली असून पृथ्वीसारखेच चांद्रपृष्ठाचे नकाशे तयार केले आहेत. मोठ्या विवरांना ख्यातनाम संशोधकांची व ज्योतिर्विदांची नावे दिली आहेत. चांद्रपृष्ठाचे निरीक्षण करताना आपल्याला कोपरनिकस, प्लेटो, ॲरिस्टॉटल, न्यूटन, टायको ब्राहे, क्लॉसियस, लाइब्निटझ् यांची कृतज्ञतापूर्वक आठवण येते. न्यूटन नावाचे विवर आकाराने लहान असले तरी ते ८७०० ( आठ हजार सातशे ) मीटर खोल आहे; —अगदी न्यूटनच्या सखोल ज्ञानासारखे!

चंद्रावरील विवरांच्या उत्पत्तीबद्दल सहा सिद्धांत किंवा परिकल्पना दिल्या असल्या तरी ती विवरे चंद्रावर धडाडणाऱ्या अगणित उल्कांच्या सतत माऱ्यामुळे निर्माण झाली असावीत असाच बहुसंख्य शास्त्रज्ञांचा अंदाज आहे. चंद्रावर वातावरण नसल्यामुळे आपाती उल्कांना कसलाच प्रतिबंध होत नाही. पृथ्वीकडे २४ तासात सुमारे १० कोटी उल्का येत असतात. पण त्यांतील बहुतेक उल्का वातावरणात शिरताच घर्षणामुळे अति तप्त होऊन भस्मसात होतात. अत्यंत थोड्या उल्का अशनींच्या रूपाने पृथ्वीपृष्ठावर आदळतात. चंद्रावर संरक्षक वातावरण नसल्यामुळे सर्वच उल्का चांद्रपृष्ठावर आदळतात आणि चंद्रकंपने घडवून आणतात. प्रतिदिनी दहा ( १० ) लक्ष उल्का

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

चांद्रपृष्ठाला धक्का देतात. त्यांतील काही उल्कांचा आक्रमणवेग प्रतिसेकंदास १६ किलोमीटरपेक्षा प्रचंडतर असतो ! रायफल बंदुकीच्या गोळीच्या वेगा-पेक्षा अधिक वेगाने उल्का चांद्रपृष्ठावर आदळत असतात !

चंद्रावर वातावरण नसल्यामुळे सौरप्रारणाचा अनर्थकारी प्रखर जम्बुपार भाग विपुल प्रमाणात चांद्रपृष्ठावर आदळतो. त्यामुळे व उल्कावर्षावामुळे चांद्रपृष्ठावर १ मीटर ते अनेक किलोमीटर जाडीचा धातुमळीसारखा दिसणारा धुळीचा दाट थर निर्माण झालेला आहे. हा थर सूर्याच्या प्रकाशापैकी ९३ टक्के प्रकाश शोषून घेतो व फक्त ७ टक्के प्रकाश परावर्तित करतो. चंद्र आपल्याला दीप्तिमान दिसतो तो इतर आकाशस्थ ज्योतींपेक्षा चंद्र निकटतम आहे म्हणून !

चंद्राला कर्षकत्वाचा गुण आहे असे अजून सिद्ध झाले नाही. चंद्राचे कर्षुकीय क्षेत्र अत्यंत दुर्बल, क्षीण असावे. पृथ्वीचे कर्षुकत्व लक्षणीय आहे. चंद्राची कर्षुकीय तीव्रता पृथ्वीच्या द्विध्रुव क्षेत्राच्या तीव्रतेच्या ५ दशलक्षांश ( $०.५\times१०^{-५}$ ) असावी. चांद्रपृष्ठावरील कर्षुकीय क्षेत्र आठ लक्षांश ( $८\times१०^{-५}$ ) गाऊजपेक्षा तीव्रतर नसावे.

असा आहे आपला चंद्र ! हा अगदी ओसाड, थंड, नीरस, भीतिदायक, सतत उल्कांचा मार खाणारा, खाचखळग्यांनी भरलेला, प्रखर सौरप्रारण किंवा सौरपवन पृष्ठावर स्वीकारणारा, मानवांना जीवनावश्यक वस्तू न पुरविणारा, दारुण औदासिन्य निर्माण करणारा उपग्रह आहे ! पण ह्याच चंद्राने मानवी विज्ञानात अत्यंत मोलाची भर घातली आहे. केवळ चंद्रामुळे लागलेल्या सूर्यग्रहणांवरून आईन्स्टाईनच्या सापेक्षवादाच्या व गुरुत्वाकर्षणाच्या सिद्धांतांना प्रायोगिक प्रमाण मिळाले, खगोलशास्त्रात महत्त्वाचे शोध लागले. विश्वाच्या उत्पत्तीबद्दल विविधतापूर्ण अनुमाने करण्याची संधी मिळाली.

शास्त्रज्ञांना चंद्राबद्दल नेहमीच आकर्षण वाटत आले आहे. दिनांक १३ सप्टेंबर १९५९ ला रशियाचे "द्वितीय लूनिक" अवकाशयान चंद्रावर जाऊन आदळले आणि त्याने रशियन राष्ट्रध्वज व इतर मानचिन्हे चांद्रपृष्ठावर रोविली "तृतीय लूनिक" ने चंद्राभोवती परिभ्रमण करीत करीत दिनांक, ४ ऑक्टोबर १९५९ ला चंद्राच्या मागील अदृश्य व अज्ञात भागाची छायाचित्रे पृथ्वीवर पाठविली. दिनांक २१ जुलै १९६९ ला सकाळी भारतीय वेळेप्रमाणे ८ वाजून २६ मिनिटांनी नील आल्डेन आर्मस्ट्राँग या अंतराळवीराने अपॉलो-११



अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

चांद्रयानातून उतरून आपले डावे पाऊल चांद्रपृष्ठावर ठेवले आणि विज्ञानक्षेत्रात अंतराळसंशोधनाचे एक नवीन युग सुरू केले. त्यानंतर अनेक अमेरिकन चांद्रवीरांनी चंद्रावर स्वारी करून चांद्रपृष्ठावर विविध यंत्रे– उपकरणे स्थापून तेथील सौरपवन, माती व खडकांचे नमुने पृथ्वीवर आणले. काही अमेरिकन अंतराळवीरांनी चांद्रपृष्ठावर मोटारी चालवून चांद्रपृष्ठाचे परीक्षण केले. यानंतर चंद्रावर असताना त्यांनी प्रथमच अवकाशात ३६ किलोग्रॅम वजनाचा कृत्रिम उपग्रह सोडला. चंद्रावरून सूर्यग्रहणाची चित्रे घेतली. अमेरिकेने अपॉलो– १७ पर्यंत चंद्रावर सहा अवकाशयाने पाठविली व डिसेंबर १९७२ मध्ये आपला चांद्रसंशोधनाचा कार्यक्रम स्थगित केल्याचे जाहीर केले.

रशियाने तर "झोंड," "लूना" व "लुनोखोद" सारखी स्वयंचलित मानवरहित याने चंद्रावर पाठवून मृत्तिकांचे व खडकांचे नमुने आणण्याचा विक्रम केला ! रशियन शास्त्रज्ञांनी चंद्रावर पाठविलेल्या द्वितीय "लुनोखोद" मधील स्वयंचलित बग्गीने नोव्हेंबर १९७३ मध्ये खड्डे, मऊ जमीन, कठीण चढण, खोल उतार आदि सर्व अवस्थांतून जाऊन ३७ किलोमीटर प्रवास केला, चांद्रपरिसराची अनेकविध निरीक्षणे मिळविली आणि आपला चांद्रभूमीच्या अभ्यासाचा कार्यक्रम पूर्ण केला.

चंद्र आता एक मोठी प्रयोगशाळा झाला आहे. तो आता मानवी बुद्धीचे एक खेळणे होण्याच्या स्थितीत आला आहे. गेल्या दहा वर्षांतील चांद्रसंशोधनातून काय निष्पन्न होईल इकडे आता सर्वांचे लक्ष लागले आहे !



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

डॉ. र. चिं. वडवे

# समाजवादी धर्तीची समाजरचना : १ :

## ( उद्दिष्ट व फलित )

काही दिवसापूर्वी एका सुशिक्षित व बहुतांशी सत्प्रवृत्त लोकसभा-सदस्या-बरोबर त्यांच्याच मोटारीतून प्रवास करण्याचा योग प्राप्त झाला होता. ते स्वतःच मोटार चालवीत होते व मी त्यांच्या शेजारीच बसलो होतो. स्वाभाविकपणेच दोघामधे विद्यार्थ्यांमधील अशांतता व तद्भूत बेशिस्त तसेच अरेरावी व विध्वंसक वृत्ति याबद्दल चर्चा चालू होती. विद्यार्थ्यांमधील अशांत-तेला मिळत असलेल्या या वळणामुळे त्यांचे वैय्यक्तिक नुकसान तर होतेच शिवाय अंती राष्ट्राचेही नुकसान होते; व म्हणून या बाबतींचा सर्वांगीण विचार करून निश्चयाने काहीतरी करण्याची वेळ आली आहे असा माझा मुद्दा होता. यावर त्यांनी या अशांततेच्या मागील कारणांचा शोध घेऊन त्यानुरूप पावले टाकण्याची आवश्यकता प्रतिपादन केली व उदाहरण म्हणून सांगितले की प्राध्यापक लोकांना उत्तरोत्तर सुधारित श्रेणीने पगार मिळतात, तसेच ते उंची कापडाचे सूटबूट चढवून मोटारी उडवीत कॉलेजविद्यार्थ्यांपुढे मिरवतात व यामुळे धड शरीरभर जाडेभरडे वस्त्रही न मिळू शकणाऱ्या असंख्य गरीब विद्यार्थ्यांच्या ते डोळ्यावर येतात. या विद्यार्थ्यांच्या मनात त्यांच्याविषयी असूया व मत्सर उत्पन्न होऊन अशांततेचा जन्म होतो. ही वस्तुस्थिती समाजवादाच्या विरुद्ध असल्याने प्राध्यापक वर्गाने आपल्या वर्तनात सुधारणा करणे अगत्याचे आहे. असे केले तरच या अशांततेला ओहोटी लागू शकेल. ही मीमांसा ऐकून मला तर अगदी गारच पडण्याची पाळी आली. नोकरीसाठी अर्ज करणारी मंडळी मुलाखतीच्या वेळी आपल्या ज्ञानाचे जे प्रदर्शन करतात त्यासंबंधी वृत्तपत्रात वेळोवेळी प्रसिद्ध होणाऱ्या खुसखुशित वार्ता इतरांप्रमाणे मीही जिभळ्या चाटीत वाचीत असतो तरीही वरील प्रकारची मीमांसा करणाऱ्या व आपले प्रतिनिधित्व करणाऱ्या महान विभू-

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

तींचे हे ज्ञान पाहून मी क्षणभर अवाक झालो हे मान्य करावयास हवे. अशा विभूतिशेजारी बसण्याची तरी माझी लायकी आहे की नाही अशा संभ्रमावस्थेने मला ग्रासून टाकले, परंतु एका सुप्रतिष्ठित महाविद्यालयाच्या प्राचार्यपदी गेली काही वर्षे मी विराजमान असल्याने काहीतरी प्रतिवाद करणे भागच होते. म्हणून प्राचार्य-प्राध्यापकांच्या आणखीही संबंधी लोकविलक्षण तारे ऐकून घेण्याचा दुर्धर प्रसंग ओढवण्याची भीती होती. मी नम्रपणे त्यांच्या नजरेस आणून दिले की ज्या गाडीतून आपण जात आहोत ती त्यांची आहे, माझी नव्हे. तसेच माझ्या वीस पंचवीस वर्षांच्या महाविद्यालयीन सेवेत धड अंगभर वस्त्रेही न मिळू शकणारे विद्यार्थी जेमतेम हाताच्या बोटावर मोजण्याइतकेच मला आढळून आले. प्राध्यापकांपेक्षाही उंची सूट-बूट घालून स्वतःच्या मोटारीतून महाविद्यालयात येणाऱ्या विद्यार्थ्यांची संख्या त्या मानाने पुष्कळच अधिक भरेल, शिवाय असे की निदान आमच्या उत्तर कन्नड (कारवार) जिल्ह्यात तरी प्राचार्य-प्राध्यापकांपैकी फक्त एकाचीच मोटार असून तीही त्यांनी तीन वर्षेपर्यन्त दरमहा पगारातून पांचशे रु. बँकेत भरण्याच्या अटीवर घेतलेली आहे. इतर कोणाचीही स्वतःची प्राध्यापकीच्या व्यवसायातून मिळणाऱ्या द्रव्यावर खरेदी केलेली गाडी नाही. माझे स्वतःचेही उदाहरण दिले. वीस पंचवीस वर्षे प्राध्यापक व अनेक विद्यापीठांची परीक्षकी करूनही स्वतःला रहाण्यासाठी दोन तीन खोल्या बांधण्याइतपत धनसंग्रह मुले मिळवती होईपर्यंत मला करता आला नाही. ही वस्तुस्थिति असताना प्राध्यापकांचे वाढते पगार विद्यार्थ्यांच्या डोळ्यात येतात या भाकडकथेवर कोण विश्वास ठेवील ? शिवाय गेल्या काही वर्षात विद्यार्थ्यांचे जे अनेक संप व असंतोषाचे इतर उद्रेक झाले त्यापैकी एकातही प्राध्यापकांच्या मोटारी पगार वा झकपक कपडे यांचा उल्लेख अप्रत्यक्षपणे ही झालेला माझ्या ऐकिवात नाही. हे सर्व लक्षात घेता उपर्युक्त सदस्य महाशय उठसूट समाजवादाचा उदोउदो करण्याच्या सध्याच्या संभावितीत ( फॅशन ) सापडून तर बोलत नाही ना अशी शंका येणे स्वाभाविक होय. माझ्या उत्तराने ते त्यावेळेपुरते तरी गप्प झाले. तरी त्यांच्या विवेचनाने माझ्या विचारांच्या चक्राला गती मिळाली. एवढ्या उच्चपदस्थ व्यक्तीचे विचार जर या प्रकारचे असतील तर सर्वसामान्य जनतेच्या डोक्यात कोणते विचार असतील या प्रश्नाकडे माझे लक्ष तीव्रतेने वेधले गेले. घरी दारी, स्त्रीपुरुष, शिक्षित-अशिक्षित इ. शी अगदी सहज म्हणून बातचित करून त्यांच्या विचारांचा कानोसा घेण्याचा मी प्रयत्न केला असता समाजवाद,



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

म्हणजे सगळ्यांना सगळे सारखे असा अर्थ बहुतेकांना अभिप्रेत असल्याचे आढळून आले. सगळ्यांना काय सारखे हे विचारता निष्पन्न झाले की प्रत्येकाला घर, धनधान्य, कपडालत्ता इ. जीवनावश्यक सामान; तसेच रेडिओ, पंखा, इस्त्री. वाहन इ. तुलनात्मकदृष्ट्या चैनीच्या वस्तु सारख्या मिळणे म्हणजे समाजवाद. आपले शासन समाजवाद आणणार आहे म्हणजे सगळ्यांना या सगळ्या वस्तु सारख्या उपलब्ध करून देणार आहे असेच बहुतेकांना वाटतेसे दिसले.

अर्थशास्त्राशी काहीसा परिचय असलेल्या व थोडा अधिक विचार करण्याची सवय असलेल्यांपैकी कित्येकाना असे वाटते की उत्पादनाची साधने व्यक्तीच्या हातात न ठेवता त्यावर समाजाची वा राष्ट्राची मालकी प्रस्थापित करणे म्हणजे समाजवाद. यायोगे वैय्यक्तिक मालक नफ्याच्या अपेक्षेने कामगारांची जी पिळवणूक करतात ती बंद होऊन आर्थिक समतेचे युग उजाडेल. म्हणूनच उत्पादक व्यवसायांचे राष्ट्रीयीकरण जसजसे वाढत जाईल तसतसे समाजवादाचे म्हणजेच समतेचे ध्येय साकार होत जाईल. उद्योगधंदे चालविण्यात व्यक्तीचा हेतू अधिक नफा मिळविणे हाच असू शकतो. परंतु शासन ज्यावेळी ते चालविते त्यावेळी समाजकल्याण हाच हेतू समोर ठेवते. म्हणून देशातील सर्व उत्पादनसाधने शासनाने ताब्यात घेणे म्हणजेच समाजवाद. आपल्या देशांतील समाजवादी व साम्यवादी पक्ष या अर्थाचा पाठपुरावा करतात व तसा प्रचार करतात. गेल्या पांच दहा वर्षात या पक्षांचा राष्ट्रीयीकरणाचा अट्टाहास काहीसा ओसरलेला असावा अशी मात्र शंका येत असली तरी त्याचा मूलभूत सिद्धांत तोच आहे यात शंका नाही. समाजवादाच्या ध्येयांशी वचनबद्ध झालेल्या आपल्या राज्यकर्त्यांच्या अनेक कृती व धोरणे यांचा मागोवा घेतला तर त्यांना समाजवादाचा कोणता अर्थ अभिप्रेत आहे याविषयी संभ्रम उत्पन्न होतो व त्याची निश्चिती करणे मुष्किलीचे होऊन बसते.

नवभारतात मी पूर्वी उल्लेखिलेली एक बाब माझ्या मनात फार दिवसांपासून खटकत आहे. ती अशी की समाजवाद, सामाजिक न्याय, बाजवी भाव, निधर्मीपणा, अलिप्तता, जागतिक शांति वगैरे अनेक जाडजूड शब्दांचा आज देशात चलनी नोटांप्रमाणे सुकाळ झालेला असला तरी या शब्दांच्या निश्चित अर्थासंबंधी फारसा विचार होताना दिसत नाही. तो अर्थ स्पष्ट करण्याची वा करून घेण्याची निकडही कोणाला भासतेशी आढळत नाही. सर्वांना तो समजतो व सर्वांच्या मनात सारखाच अर्थ आहे असे गृहीत धरूनच व्यवहार चाललेला

अनुक्रमणिका
मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

दिसतो. या संदिग्धतेमुळेच बहुधा स्वार्थसाधु व्यक्ति व पक्ष जनतेच्या अज्ञानाचा लाभ उठवून तिच्या डोळयात, विशेषत: निवडणुकीच्या काळात, धूळ फेकून आपला स्वार्थ साधू पहातात. समाजवादाचा वेळी अवेळी उद्घोष करणाऱ्या पुढाऱ्यांचे पेव सर्वत्र फुटलेले असूनही सामान्य जनता, विशेषत: तिच्यातील खालचे थर जणूं निर्नायकी अवस्थेत अक्षरश: पोरकेपणाचे जीवन कंठीत आहेत. हे सर्व पाहिले म्हणजे मनावर विषण्णतेची काळी छाया पडते. तळाशी असलेल्या या थरांना निदान माणूस म्हणून जगता येण्याइतपत सुखसोयी उपलब्ध होण्याचे दिवस दृष्टिपथात कधी येतील हे समजेनासे होते; बुद्धिमंतांचे अवमूलन चालू असलेल्या या काळात या दारुण स्थितीवर पुन्हा पुन्हा प्रकाश-झोत टाकून जनतेचे लक्ष तिच्यावर केंद्रित करण्याखेरीज तो दुसरे काय करू शकणार ? म्हणून समाजवाद म्हणजे काय, हे ध्येय आपण केव्हा व कसे निश्चित केले, राज्यकर्त्यांना त्याचा कोणता अर्थ अभिप्रेत आहे. आपली मुख्य समस्या कोणती आहे इ. चा विचार जनतेसमोर मांडणे हा या लेखाचा हेतु आहे. मात्र यात विद्वत्ता-पूर्ण व सर्वांगीण चर्चेचे उद्दिष्ट माझ्यापुढे नसून सहजासहजी उपलब्ध झालेले चारसहा ग्रंथ व पंचवार्षिक योजनांचे काही खर्डे या मुद्यापुरते चाळून सामान्य माणूस म्हणून सुचलेले विचार व्यक्तविणे इतकेच उद्दिष्ट मी समोर ठेवलेले आहे. हे करताना माझा दृष्टिकोन असा की राज्यशास्त्र काय, अर्थशास्त्र काय अथवा समाजवाद अगर इतर वाद काय हे सर्व मानवी जीवनासंबंधी असल्याने व त्या सर्वांचा उगम अंती मानवी मनात असल्याने, निसर्गाने माणूस व मानवी मन मूलत: कसे घडविले आहे व त्यात कितपत बदल घडवून आणणे शक्य आहे हे लक्षात घेऊनच सर्व अभ्यास व्हावयास हवा; नहून त्यात वास्तवता राहणार नाही. उत्तुंग ध्येये व आकाशाला गवसणी घालणारे सिद्धान्त मांडण्यात विशेष बुद्धिमत्तेची गरज नसते. कोणी सोम्यागोम्याही हे काम करू शकेल व विश्वोद्धाराची गुरुकिल्ली गवसल्याची बढाई मारू शकेल. ही ध्येये या सिद्धांताप्रत आपल्याला नेऊ शकतील असे वास्तववादी मार्ग शोधण्यात बुद्धिमत्तेची व तेथे प्रत्यक्ष नेऊन दाखविण्यातच कर्तृत्वाची खरी कसोटी असते. यासाठी विविध क्षेत्रातील मानवी वर्तनाचा क्षेत्रीय अभ्यास फारच उपयुक्त ठरेल यात शंका नाही. गेली कित्येक वर्षे पाश्चात्य देशात असा अभ्यास चालू आहे. माझ्या गाठी मात्र असा अभ्यास म्हणावा तसा नाही. यामुळे सभोवतालच्या प्रत्यक्ष मानवी वर्तनाचे निरीक्षण करीत करीत जो अनुभव माझ्या गंगाजळीत जमा झाला त्याच्या आधारानेच पुढील विवेचन केले आहे.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

## समाजवाद म्हणजे काय–

शब्दकोषात समाजवादाचा अर्थ सामाजिक समता, व व्यक्तीच्या स्वातंत्र्याला गौणत्व देऊन समष्टीच्या हिताला प्राधान्य देणे असा सापडत असला तरी प्रत्यक्ष कृतीच्या बाबतीत त्यातून काही मार्गदर्शन मिळू शकत नाही. म्हणून इतिहासाच्या मागोव्याने कोणता अर्थ निघतो हे पाहू. समाज टिकला पाहिजे व समृद्ध झाला पाहिजे हे जितके खरे तितकेच व्यक्तीला व्यक्ति म्हणून काही नैसर्गिक वा मूलभूत हक्क आहे व तेही टिकले पाहिजेत हे खरे असे आपण म्हणतो. म्हणून सामाजिक तत्ववेत्यांपुढील कठीण समस्या अशी की शासनाने स्वतःकडे कोणकोणती कार्यक्षेत्रे घ्यावी व विशेष हस्तक्षेप न करता व्यक्तींच्या स्वातंत्र्यावर कोणती क्षेत्रे सोडावी याचा निकष तयार करणे. ही दोन क्षेत्रे विभागणारी सैद्धान्तिक लक्ष्मणरेषा उपलब्ध नाही. विचारवंतांचा एक संप्रदाय असे प्रतिपादतो की व्यक्तीचे महत्त्व ( तसेच तिच्या इच्छा आकांक्षांची परिपूर्ति ) हे सामाजिक संबंधावर मुख्यत: अवलंबून असल्याने तिच्या स्वातंत्र्यापेक्षा तिच्यावरील सामाजिक नियंत्रणाला प्राथम्य देणे जरूर आहे. हे नियंत्रण किती असावे व ते कोणकोणत्या क्षेत्रात असावे याच्या विचारांतून अनेक उपसंप्रदाय उत्पन्न होतात. दुसरा एक विचार म्हणजे सामुदायिकतेचा ( collectivism ). किसान, कामगार वा कारखानदार हे सर्वच घटक धनोत्पादनाला हातभार लावीत असले तरी त्यापैकी प्रत्येकजण समूहाचा घटक असल्याने इतर घटकांच्या श्रम व सहकार्यानेच त्याला ते करता येते. म्हणून या धनावर त्यांना व्यक्तिगत रीत्या शंभर टक्के अधिकार सांगता येणार नाही. पायारूप समाजवादी सिद्धान्त तो हाच. समाजवादाचा टिळा न लावणारेही असे अनेक विचारवंत आहेत की जे समाजातील खालच्या व म्हणून दुर्बल असलेल्या घटकांच्या कल्याणार्थ उत्पादनसाधनांच्या खाजगी स्वामित्वावर सामुदायिक बंधने घालण्याची आवश्यकता प्रतिपादतात. त्यांचे म्हणणे असे की वाढत्या औद्योगीकरणाने संपत्तीत मोठी वाढ होत असली तरी त्यायोगे समाजातील मोठ्या बहुसंख्येच्या जीवनात म्हणण्यासारखी सुधारणा होत नाही. फक्त काही जणच वैभव उपभोगतात. म्हणून ही बंधने अपरिहार्य होत. सामाजिक बंधनांचा हा विचार बराच जुना असला तरी त्या तपशिलात न शिरता येथे इतके म्हणणे पुरे होईल की १९ व्या शतकाच्या मध्यास मार्क्स व एंगल्स यानी या विचारांना शास्त्रीय बैठक देऊन वैज्ञानिक समाजवादाचा पुकारा केला. त्यानंतर युरोपात व कालानुसार आपल्या

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

देशातही अनेक समाजवादी विचारवंत व कार्यकर्ते उदयास आले व आजही आहेत. त्यांच्या प्रयत्नांनी कामगारवर्गाची स्थिती सुधारत गेली. या संदर्भात महत्वाचा एक मुद्दा असा की समाजवाद म्हणजे उपलब्ध संपत्तीचे समान वाटप असे समजून त्यावर बरीच टीका होत असली तरी खुद्द मार्क्सच्या सिद्धान्तात या समतेचा उल्लेख आढळून येत नाही. त्याच्या मते वाटपाची पद्धति ही ऐतिहासिक विकासाचे टप्पे व उत्पादनाचे सामान्य संघटन ( organization ) यातील बदलानुसार बदलत रहाते; तसेच कामगार क्रांति होऊन उत्पादनाची साधने त्यांच्या मालकीची झाल्यानंतर 'प्रत्येकाकडून त्याच्या शक्तीप्रमाणे व प्रत्येकास त्याच्या गरजेप्रमाणे' हेच वाटपाचे मुख्य सूत्र होय. त्याने वर्गयुद्धाचा पुरस्कार केला व कामगारांची सत्ता प्रस्थापित होईपर्यंत वर्गयुद्ध चालू राहील असा विश्वास व्यक्तविला. वर्गरहित समाजाची स्थापना व त्यात सामाजिक आणि बौद्धिक विकासाची सर्वांना पूर्ण संधि हेच अंतिम ध्येय म्हणून त्याने पुरस्कारले. मार्क्सला अभिप्रेत असलेला समाजवाद हा वर्गयुद्ध व क्रान्तीच्या मार्गाने प्रस्थापित होणार असून त्याला साम्यवाद ( Communism ) हे नाव मिळाले. त्यात ध्येय व ते साधण्याचे मार्ग निश्चित असल्याने लोकमत विचारात घेऊन त्यानुसार पावले टाकण्याचा प्रश्नच उत्पन्न होत नाही. लोकशाही समाजवाद मात्र वर्गयुद्ध व क्रान्ति या मार्गावर जोर न देता लोकशाही पद्धतीने जवळ जवळ तेच ध्येय गांठण्याचा पुरस्कार करतो. त्यासाठी उतावीळ करण्याची जरूर त्याला वाटत नाही. टप्प्याटप्प्याने ध्येय साकार होत गेले तरी त्याची हरकत नाही. जनता ज्या ज्या प्रमाणात संपत्ति देत जाईल त्या त्या प्रमाणात तो पुढें जाऊं इच्छितो. यामुळेच १९५० नंतर ब्रिटनमध्ये मजूरपक्ष व जर्मनीमधील सामाजिक लोकशाही पक्ष याना निवडणुकीत पुन्हा पुन्हा अपयश आल्यानंतर त्यांनी उद्योगधंद्यांच्या राष्ट्रीयकरणाचे कार्य बहुतांशी बाजूला टाकून सामाजिक समता व कल्याणकारी राज्य यावर आपली शक्ति केंद्रित केल्याचे दिसून येते. साम्यवादात अशा बदलांना फारसे स्थान नाही. मतपरिवर्तनाचा मार्ग त्याच्या चौकटीत बसत नाही व त्यावर त्याचा विश्वासही नाही. यामुळेच ज्या देशात लोकशाही परंपरा नाहीत तेथे साम्यवाद प्रस्थापित करणे, अशी परंपरा असलेल्या देशांपेक्षा अधिक सहजसाध्य होते. भारतीय सार्वजनिक जीवनात लोकशाही मुरलेली आहे असे म्हणता येत नसले तरी गेली ५०।६० वर्षे ती रुजविण्याचे व संवर्धनाचे प्रयत्न चालू असून तिने आता मूळ धरले आहे इतके तरी म्हणण्यास प्रत्यवाय दिसत नाही. यामुळें येथेही ब्रिटिश व जर्मन अनुभवाची पुनरुक्ति



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

होण्याची काहीशी चिन्हे आजही दिसून येतात. उद्योगधंद्यांच्या राष्ट्रीयीकरणाचा पुरस्कार मधून मधून कानांवर येत असला तरी सामाजिक समता व कल्याणकारी राज्य यावरच मुख्य भर देण्यात येत आहे.

वरील पार्श्वभूमि नजरेसमोर ठेवून आपल्या राज्यघटनेत नमूद करण्यात आलेली राज्याची उद्दिष्टे व ती गाठण्यासाठी म्हणून आखण्यात आलेल्या पंचवार्षिक योजनांची कार्यवाही यांच्या संदर्भात, समाजवादाची वाटचाल कसकशी चालू आहे व इष्ट सिद्धीसाठी त्यात काही बदल करण्याची आवश्यकता आहे की काय याकडे वळू.

## घटनेत नमूद करण्यात आलेले राज्याचे अंतिम उद्दिष्ट

आज जरी समाजवादाच्या ध्येयाचा डंका सर्वत्र वाजत असला व त्यांच्या नावावर कांही गोष्टी करण्यात येत असल्या तरी राज्याच्या ध्येयधोरणाबाबत आपली राज्यघटना काय म्हणते हे प्रथम पाहणे महत्वाचे आहे. घटनेच्या चवथ्या भागांत या संबंधीची मार्गदर्शक तत्त्वें सांगितलेली आहेत. कलम ३७ सांगते की या भागात पुरस्कारलेल्या तत्त्वाच्या कार्यवाहीसाठी कोणालाही न्यायालयातून दाद मागता येणार नसली तरीही ही तत्त्वे मूलभूत स्वरूपाची असून राज्यकारभार करतांना अथवा कोणतेही निर्बंध ( कायदे ) स्वीकृत करताना ती सदैव नजरेसमोर ठेवावीत. ३८ व्या कलमांत जनतेचे वाढते कल्याण साध्य होण्यासाठी सामाजिक, आर्थिक आणि राजकीय न्याय अंतर्भूत असलेली समाजव्यवस्था स्थापन करण्याच्या दिशेने राज्याने प्रयत्न करावेत असे सुचवून ३९ व्या कलमांत त्या संबंधीचा तपशील दिला आहे. तो असा : सर्व स्त्रीपुरुष नागरिकांना उदरनिर्वाराचे साधन उपलब्ध करून देणे, जनतेचे कल्याण हे उद्दिष्ट ठेवून साधनसंपत्तीची मालकी व नियंत्रण निश्चित करणे, आर्थिक केंद्रीकरण अथवा समाजहिताशी विरोधी ठरणारे उत्पादन न होईल अशी काळजी घेणे, सारख्या कामासाठी स्त्रीपुरुषांना सारखाच पगार मिळणे व समाजात कोणत्याही प्रकारची पिळवणूक होणार नाही अशी दक्षता घेणे.

वरील ध्येय विवेचनात समाजवादाची काही मूलभूत तत्त्वे अनुस्यूत असली तरी 'समाजवाद' अथवा 'समाजवादी धर्तीची समाजरचना' या शब्दांचा उपयोग केलेला नाही. समाजवादी धर्तीची समाजरचना हे सध्याच्या राज्यकर्त्यापक्षाने स्वतःपुढे ठेवलेले ध्येय आहे. म्हणून या ध्येयाला विरोध करण्यात घटनेचा भंग होत नाही, तसेच तद्व्यतिरिक्त अन्य ध्येयाचा पुरस्कार

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

करण्यात जराही अनौचित्य नाही. अंती जनतेचे कल्याण हेच सर्व ध्येयांचे सार असल्याने शब्दाबद्दल अवडंबर न माजविता राज्यकर्त्यांच्या धोरणाने हे कल्याण खरोखरी होत आहे की नाही हाच निकष लावून त्याची तपासणी करणे इष्ट होय. यासाठी जनतेचे कल्याण म्हणजे नेमके काय ह्याची रूपरेखा निश्चित करायला हवी. असे न केल्यास विविध योजनांसाठी अब्जावधी रुपयांचा व्यय होऊनही समाजातील काही घटकांचे अथवा काही शेलक्या मंडळींचे कोट-कल्याण झाले तरी सामान्य जनता आहे तेथेच रहाण्याचा व त्यातून कोणता तरी संघर्ष पेटण्याचा धोका संभवतो. कल्याणाचा अर्थ व ते साधण्याचे मार्ग ठरविताना कोणत्याही उत्तुंग अशा ध्येयवादाच्या जंजाळात अडकून चर्चा न करता अगदी सामान्य अशा व्यवहारज्ञानाच्या आधाराने चर्चेचा उपन्यास करणेच सद्यस्थितीत उचित होईल. याचे कारण इतकेच की उत्तुंग ध्येयवादा-साठी जीवाचे रान व प्रसंगी प्राणार्पण करणाऱ्यांची योग्यता कितीही थोर असली व ते आपल्याला कितीही वंदनीय असले तरी अशी श्रेष्ठतम मंडळी कोट्यावधी जनतेत हाताच्या बोटावर मोजता येण्याइतकीच असतात. ऐहिक स्वरूपाच्या आत्मकल्याणाची त्यांना जराही फिकीर नसते. त्यांचे विचार व कार्यक्षेत्र अगदी भिन्न असतात. आपण ज्यावेळी जनतेच्या कल्याणाचा विचार करतो त्यावेळी आपल्या मनःचक्षूपुढे ही अपवादात्मक मंडळी नसून ९९% सामान्य जनता असते. व या जनतेचे कल्याण आपल्याला अभिप्रेत असते, निदान असावयास हवे.

कल्याण हा शब्दही सापेक्ष असून त्याची कक्षा परिस्थितीनुरूप विस्तारत जाते. परिस्थितीच्या अनुकूलतेनुरूप मनुष्याच्या गरजा वाढत जातात. समाज-स्थैर्य व राज्यघटनेतील मार्गदर्शक तत्त्वे यांच्याशी अविरोधी व सुसंगत असतील त्या त्या गरजा पूर्ण करीत जाणे म्हणजेच जनतेचे कल्याण साधणे होय. अध्यात्मिक व पारलौकिक कल्याणाचा प्रश्नही विशिष्ट दृष्टीने महत्वाचा आहे. परंतु या लेखातील विवेचन मुख्यतः ऐहिक कल्याणापुरतेच मर्यादित आहे व तेही मनुष्यस्वभावाच्या आराखड्यात ठाकठीक बसेल असे.

गरजा अनेक किंबहुना अपरिमित असल्या व त्या भागविण्यासाठी आपण सदैव झटत असलो तरी सर्वच गरजा मूलभूत नसतात. जिजीविषा ही प्रत्येक मनुष्यात ( अर्थात प्राण्यातही ) तीव्र स्वरुपात वास करीत असून ती त्याच्या सर्व कार्यप्रेरणेचे आदिस्थान आहे. जीवनकलह अथवा जीवनार्थ धडपड ही प्रत्येकाची केंद्रीय धडपड असून एकदा जगण्याची निश्चिती झाली म्हणजे इतर


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

आशा-आकांक्षा व मूल्ये याकडे तो वळतो. यामुळे जगणे शक्य होण्यासाठी म्हणून ज्या गरजा भागल्या गेल्याच पाहिजेत त्या गरजा मूलभूत होत. म्हणूनच अन्न, पाणी, वस्त्र, निवारा इत्यादी गरजा मूलभूत मानल्या जातात. इतर गरजा या देशभूमीची समृद्धता व साधनसामग्रीची उपलब्धता यानुरूप उत्पन्न होतात. या दोन्ही गरजा जसजशा भागत जातील तसतसे जनतेचे कल्याण अधिकाधिक होत जाईल. मात्र यापैकी मूलभूत गरजांच्या पूर्तीकरणाला अग्रक्रम देणे अवश्य आहे. कारण उघडच आहे. या गरजा इतक्या तीव्र असतात की त्या भागविण्यासाठी माणूस कोणतेही दुष्कृत्य करण्यास मागे-पुढे पहाणार नाही. जगण्याच्या प्रश्नापुढे सामाजिक, नैतिक वा अन्य मूल्ये कोसळून पडण्याचा म्हणजेच समाजजीवन उध्वस्त होण्याचा धोका संभवतो. म्हणून स्वतःला कल्याणकारी म्हणवून घेणाऱ्या प्रत्येक राज्याने जनतेच्या गरजा भागविण्याकडे वाढते लक्ष पुरविताना प्रथम मूलभूत व नंतर इतर असा क्रम सातत्याने नजरेसमोर ठेवणे महत्वाचे आहे.

राज्यघटनेत नमूद केलेल्या उद्दिष्टात जर समाजवाद अथवा समाजवादी धर्तीची समाजरचना या शब्दांचा उपयोग आढळत नाही तर ते शब्द चालू ध्येय-वाक्यात अगदी चलनी नाण्याप्रमाणे कसे शिरले हेही जाता जाता पहाणे इष्ट होईल. वर एके ठिकाणी उल्लेखिल्याप्रमाणे समाजवादाचा ऊहापोह गेली ५०-७५ वर्षे तरी आपल्या देशात अधिकउण्या प्रमाणात चालू असला तरी त्या वादाला प्रतिष्ठितपणा व लोकप्रियता मिळवून देण्यात कै. पंडित जवाहरलाल यांचे प्रयत्न मुख्यतः कारणीभूत झाले. स्वातंत्र्यसंपादनाच्या लढ्यात ते अनेक वर्षे अग्रभागी चमकत असल्याने त्यांचे नांव राष्ट्रवादाशी चिरस्वरूपात जोडले गेले असले तरी १९२० नंतर त्यांचा किसान चळवळीशी आलेला निकटसंबंध व १९२६ नंतर त्यांनी यूरोप व विशेषतः रशियाला दिलेली भेट यामुळे त्यांची दृष्टि व्यापक होत गेली व देशांतील दलितांची दुःस्थिती प्रत्यक्ष अवलोकल्यानंतर त्यांची विचारांची दिशा समाजवादाकडे झुकली हे प्रसिद्धच आहे.

राजकीय स्वतंत्रता कितीही अगत्याची असली तरी सामाजिक स्वतंत्रता व समाजवादी धर्तीची समाजरचना यावाचून राष्ट्र व व्यक्ति यांचा जरूर तो विकास होणार नाही अशी त्यांची निश्चिती पटली. राजकीय लोकशाहीने प्रत्येक व्यक्तीस मताधिकार मिळाल्याने निर्माण होणारी समता ही फक्त वरवरची व दिखावू असून त्यायोगे आर्थिक पिळवणुकीपासून गरीबांना संरक्षण मिळत नाही, त्यांची रोजची भूक भागत नाही; उलट राजकीय लोकशाहीचा लोकशाही विरोधी

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

हेतूंच्या पूर्ततेसाठीही साधन म्हणून उपयोग केला जातो असे आता वाटू लागले. उदाहरणार्थ, ब्रिटिशांची घरी लोकशाही व भारतांत हुकूमशाही. साम्राज्यवाद व भांडवलशाही यांच्यात सुधारणा होणे शक्य नाही, तसेच भांडवलशाही व समाजवाद यांत समन्वय होणे अशक्य आहे. म्हणून समाजवाद ही भारताचे व जगाचे प्रश्न सोडविण्याची गुरुकिल्ली होय. समाजवाद हा फक्त आर्थिक सिद्धान्त नसून तो एक जीवनाचे तत्वज्ञान आहे. नेहरूंना ही जी दृष्टी प्राप्त झाली ती मार्क्स व लेनिन यांच्या ग्रंथाचे वाचन व रशियांतील त्यांचे अनुभव यांचा परिपाक होय. मार्क्समुळे त्यांना इतिहासक्रमाविषयीही नवीन दृष्टी मिळाली. इतिहास म्हणजे निवळ राजेरजवाड्यांची कारकीर्द अथवा युद्धांचा अभ्यास नाही तर मानवजातीचा तार्किक दृष्टीने सुसंबद्ध असा विकासक्रम शोधण्याचा प्रयत्न होय असे त्यांना वाटू लागले. रशियांतील साम्यवादाच्या प्रयोगाने त्यांना आकर्षित केले; तरी तेथे चालू असलेली व्यक्तिस्वातंत्र्याची गळचेपी व ध्येय-सिद्धीसाठी करण्यात येत असलेले अत्याचार मात्र त्यांना मुळीच पसंत नव्हते.

स्वातंत्र्योत्तर काळात व कदाचित त्यापूर्वी पासूनही नेहरूंच्या समाजवाद-विषयक कल्पनांत फरक होत गेला. समाजवाद हा आर्थिक व सामाजिक समस्यांकडे शास्त्रीय दृष्टिकोनातून पहाण्यास शिकवीत असल्याने त्याकडे पूर्वी नेहरु आकर्षिले गेले होते. परंतु अंती दुसऱ्या महायुद्धात परिणत झालेल्या घटनांमुळे त्यांना आपल्या विचारांची फेरतपासणी करावी लागली. पंतप्रधान झाल्यानंतर प्रत्यक्ष कार्याची जबाबदारी पडल्यानेही ही फेरतपासणी अवश्य झाली असावी. जनतेची रहाणी सुधारणे असेल तर प्रथम उत्पादन वाढविले पाहिजे; निवळ उद्योगधंद्याच्या राष्ट्रीयीकरणामुळे उत्पादन वाढेलच असे नाही; तसेच साधनांचा बाऊ न करता साध्य कितपत पूर्वस्वरूपात आले हीच धोरणाच्या यशाची कसोटी होय व हिंदुस्थानात खाजगी व राष्ट्रीय मालकीच्या अशा दोन्ही उद्योगधंद्याना वाव ठेवल्यानेच जीवनाचा दर्जा सुधारेल असे त्यांना वाटू लागले. नेहरूंच्या विचारांचा विकास मुद्दाम लक्षात घेण्याजोगा आहे. सुरवातीला ते बहुतांशी मार्क्सवादी होते. वर्गयुद्धाच्या मार्गाने भांडवलशाही नष्ट करून समाजवाद स्थापित करणे व अंती वर्गविहीन समाजाची प्रतिष्ठा-पना करणे हाच भारत व मानवजातीपुढील एकमेव पर्याय आहे, असे त्यांना वाटत होते. परंतु नंतर मात्र त्यांचा समाजवाद बराचसा पातळ झाला. वर्गविहीन समाजवादी समाज स्थापण्याचे उद्दिष्ट कायम राहिले तरी वर्ग-विग्रहाऐवजी लोकशाहीचा मार्ग, व भांडवलशाही नष्ट करण्याऐवजी तिचा


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

उपयोग करून मिश्र अर्थव्यवस्थेद्वारा ध्येयसिद्धि गाठणे त्याना अधिक योग्य वाटू लागले.

पन्नास वर्षांपूर्वी अतिशय मागासलेल्या अवस्थेत असलेल्या रशियाला तेथील साम्यवादी राज्यकर्त्यांनी एका मागोमाग एक अशा अनेक पंचवार्षिक योजना आखून व त्या अतीव निग्रहाने पार पाडून सर्वांगीण उन्नतीप्रत नेले व जगातील प्रथम श्रेणीच्या राष्ट्राच्या दर्जाप्रत आणून सोडले हा प्रत्यक्षानुभव लक्षात घेऊन नेहरूंच्या नेतृत्वाखालील भारत सरकारनेही त्याच मार्गाने जाऊन या दारिद्र्य-पीडित राष्ट्राला पुढे नेण्यासाठी कंबर कसली. परिणामी १९५१ पासून येथेही नियोजनाचे पर्व सुरू झाले. यातही सुरवातीला समाजवादी दृष्टिकोन नव्हता. तो नंतर ३।४ वर्षांनी स्वीकारण्यात आला. या सर्व तपशिलाची महिती पुढील लेखांकात करून घेऊ.

◆ ◆ ◆

१९४७–१९५४ पर्यंत झालेल्या मराठी पुस्तकांत प्रथम क्रमांकाचे साहित्य अकादमी (नवी दिल्ली) चे रु. पाच हजार पारितोषिक प्राप्त झालेले

वैदिक संस्कृतीचा विकास

(सुधारून वाढविलेली नवीन आवृत्ती)

पृ. ६०० ] [ किंमत ३० रुपये.

लेखक– तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी.

वैदिक संस्कृतीचे विकसित रूप म्हणजेच आजची भारतीय संस्कृती होय. भारतीय संस्कृतीच्या जन्मापासून आतापर्यंत आलेल्या स्वरूपाचे वर्णन या पुस्तकात प्राधान्याने केले आहे.

प्रकाशक : प्राज्ञपाठशाळामंडळ वाई (जि० सातारा)

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

## पुस्तक-परामर्श

### तीन मराठी कोश

१. शासन व्यवहार कोश (शाव्यको) पृ. ६१४; भाषा संचालनालय, महाराष्ट्र शासन.

२. लोकसाहित्य शब्दकोश (लोसाश) पृ. ३९१; महाराष्ट्र लोक-साहित्य समिती पुणे १.

३. मराठी तंजावरी कोश (मतंको) पृ. १७९.

पहिली दोन पुस्तके शासकीय मुद्रणालय, मुंबई ४ येथे आणि तिसरे व्हीनस प्रकाशन पुणे ३० येथे मिळतील; तिन्ही पुस्तकांच्या किमती दिल्या नाहीत.

"मराठीच्या मूळ प्रकृतीला व प्रवृत्तीला ज्यायोगे बाध येईल अशा तऱ्हेने भाषेत उलथापालथ करण्याचा शासनाचा विचार नाही." असे नामदार वसंतराव नाईक यांनी स्पष्टपणे जाहीर केले हे छान झाले. कारण शासन व्यवहारकोश (शाव्यको) प्रसिद्ध झाल्याने त्याचे प्रयोजनही कळून चुकले. आजपर्यंत आमची समजूत अशी की भाषांचा अभ्यास फक्त विद्यापीठांत किंवा तत्सम संस्थान आणि त्यांना संलग्न अशा महाविद्यालयात चालतो. महाराष्ट्र शासनाचा इरादा निराळा दिसतो. विद्यापीठांचा भाषा-व्यवहारांशी संबंध नसावा अशी त्याची समजूत झालेली असावी. एरवी निरनिराळ्या विद्यापीठांत चालू असलेले शास्त्रीय परिभाषेचे काम शासकीय भाषा संचालनालयाने आपणांकडे ओढून घेतले नसते. स्वायत्त विद्यापीठांनी आपले औरस हक्काचे काम अशा शासकीय खात्याकडे का द्यावे. हाही प्रश्न आहे खरा. पण लोककल्याणकारी शासनाचे असे आक्रमण किती विविध क्षेत्रात झाले आहे? अशाने लोकांना करण्यासारखे काहीच कार्य उरणार नाही असे दिसते ... असो.

"शाव्यको" ची रचना अशी आहे: इंग्रजी शब्द त्याची "जात", जरूर तेथे विषयनिर्देश; अर्थच्छटा पर्यायी अर्थ – इंग्रजी स्पष्टीकरण; मराठी पर्याय लिंग; जरूर तेथे मराठी उपयोग; इंग्रजी वाक्प्रयोगाचा मराठी पर्याय आणि शब्द-कुळे : शब्द-कुळे हे या "शाव्यको" चे खास वैशिष्ट्य समजावे. ना. वसंतराव नाईकांच्या प्रास्ताविकात (पृ. सहा–सात) "शब्दकुळे" चा दोनदा उल्लेख आहे. तो शब्दकुळाचा दिसतो. समानअर्थी शब्दांची मालिका म्हणजे शब्दकुळ अशा सर्व शब्दांच्या अर्थात सूक्ष्म भेद असतो. शासन

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

व्यवहारात विशेषतः कायदेशीर भाषेसाठी निश्चितार्थाचे शब्द ( शब्दाचे निश्चितार्थ ) ठाऊक असणे अत्यंत आवश्यक आहे म्हणून ह्या कोशाला शासन व्यवहार कोश म्हटले.

तीस हजार शब्दांची कच्ची प्रत होती असे निवेदनात म्हटले आहे. ( पृ. अकरा ) आणि पाठ्यपुस्तक मंडळाने रूढ केलेल्या पद्धतीनुसार ह्या कच्च्या प्रती "नामवंत लेखक, भाषातज्ञ, वृत्तपत्रकार" यांजकडे पाठविल्या. पाठ्यपुस्तक मंडळाच्या दोनशे अडिचशे प्रती जाणत्यांकडे जात होत्या. तरी त्यात किती दोष राहिले आणि त्याबद्दल किती ओरड झाली हे सांगण्याचे प्रयोजन नाही. कोश बनविण्याची प्रतिकृती समजण्यासाठी ही गोष्ट निवेदनातून निवडली. मुख्यमंत्र्यांच्या प्रास्ताविकात ह्या प्रतिकृतींचा दुसरा पैलू प्रकट होतो : पुणे, मुंबई, नागपूर, कोल्हापूर, वाई अशा ठिकाणी भाषा सल्लागार मंडळाच्या बैठकी झाल्या. यावरून सल्लागार मंडळाचे काम कसे झाले हे समजते. डॉ. कोलते यांच्यासारखे कुलगुरू, डॉ. दांडेकरां-सारखे विद्यापीठ गुरू. अशांना ह्या शब्दांच्या कारखान्यांत राबविण्याचा शहाणपणा शासनाने तरी टाळणे इष्ट होते. आधीच विद्यापीठांतील अध्ययन, अध्यापन याबद्दल बरीच ओरड होत असता, शब्द बनविण्याच्या निमित्ताने कुलगुरू— आणि इतर प्राध्यापक यांना महाराष्ट्र दर्शनासाठी का न्यावे हे कळत नाही. हा नवा शब्द-कारखाना अगदी नव्या पद्धतीने चाललेला दिसतो. अशा वेळी एक विचार उफाळून वर डोके काढतो. साहेबाची इंग्रजी भाषा आपण वापरू लागलो. तेव्हा अशा कोशांची मदत आपणास साहेबाने उपलब्ध करून दिली होती का ? मग आता मातृभाषा— स्थानिक भाषा वापरताना इतकी खटपट खरोखर हवी काय ? का भाषा संचालनालय "चालू" राहिले पाहिजे म्हणून हा सारा ( महाराष्ट्र—दर्शनाचा देखील ) खटाटोप आहे ? आणि असे शासनाला उपयोगी कोश करण्यासाठी इतक्या प्राध्यापकांची गरज खरोखर भासते की काय ? चेंबर्स आणि वेब्स्टर हे दोन कोश आधारभूत घेऊन 'शाव्यको' तयार केला. वास्तविक इंग्रजी भाषा आधारभूत आपण मानतो ती राजाची किंवा राणीची. म्हणून ऑक्स्फर्ड डिक्शनरीची थोरवी आपोआप सिद्ध होते. शिवाय आपली घटना, आपले रेडिओ खाते, आपली न्याय पद्धति आणि शिक्षण खाते... किंबहुना आपले पुष्कळसे शासन ब्रिटिश नमुन्याबर-हुकूम असता "'ऑक्स्फर्ड'" कोशाला डावलण्याचा हेतु लक्षात येत नाही.

आतापर्यन्तच्या कार्यपद्धतीत महाराष्ट्र शासनाने थोडा बदल केलेला दिसतो. हा बदल इष्ट आहे— आधीपासूनच करावयास हवा होता; पण उशिरा



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

का होईना शहाणपण सुचले, याबद्दल समाधान मानले पाहिजे. पहिली काही वर्षे ह्या भाषाखात्याने असे धोरण आखले होते की मराठी वर्तमानपत्रात रूढ झालेली भाषा वापरायची नाही. अखिल भारतीय भाषा एक असावी म्हणून दिल्लीहून फर्मान निघे, त्याप्रमाणे तेच शब्द वापरीत.

गायकवाडीत रूढ केलेली धारा-सभेची शब्दावली, बंगाल सरकारची व जुन्या मध्यप्रदेशची कायदे मंडळांची शब्दावली, आपणास उपयोगी पडण्यासारखी असता, रघुवीरी आणि दिल्लीच्या टांकसाळीवर भाषाखात्याची भिस्त होती-ती बरीच ओसरलेली दिसते. मराठीत आतांपर्यंत वापरून रूढ झालेले पुष्कळ शब्द 'शाव्यको'त पतकरले आहेत. ही निःसंशय प्रगति म्हणावी की नाही ?

सर्टिफिकिट (दाखला), रेझोल्यूशन (ठराव), गव्हर्नमेंट (सरकार), पोलिस (पोलिस), कूली, पोर्टर (हमाल), इम्पोर्ट (आयात), इन्फर्मेशन (माहिती) केटल् (किटली), इरिगेशन (पाटबंधारे) इत्यादि मराठी रूढ शब्दांना मान्यता मिळाली हा फरक लक्षात येतो. परंतु अमेरिकन कोशामुळे असेल कदाचित. दि सिटी (सिटी-एडिटर )चा इंग्रजी अर्थ "शाव्यको" च्या लक्षात आला नाही. आजही सिटी-न्यूजचा इंग्रजी आणि अमेरिकन अर्थ भिन्न भिन्न आहेत. व्यापारी उलाढाली, नाणेबाजार असा अर्थ इंग्रजी रिवाजाप्रमाणे होतो तर शहरांतली बातमी असा सरळ अर्थ अमेरिकन करतात.

शाव्यकोमुळे शासनातील बरीच माहिती स्पष्ट झाली ( भत्ते ) किती प्रकारचे रूढ आहेत. हे नव्यानेच समजले. ( पृ. २७–२८) एकूण ३१ प्रकारचे भत्ते बिगर लष्करी नोकराना मिळतात असे दिसते. गैरहजेरीचा भत्ता, पोषाख भत्ता, धुलाई भत्ता, गिरी भत्ता, अतिकालिक ( ओव्हर टाइम ) भत्ता ... असे प्रकार वाचून करमणूक होते, लष्करी अधिकाऱ्यांच्या भत्त्यात आणखी बरेच प्रकार आहेत. कौटुंबिक राहणीचा भत्ता, बायकोचा विरह झाल्याचा भत्ता, भाषा शिकण्याचा भत्ता, केस कापणी भत्ता ... मुलांचा भत्ता ... असे पुष्कळ भत्ते लष्करी रिवाजामुळे मिळतात. असो.

'शाव्यको'ची वैशिष्टये पुष्कळ आहेत. शब्दकुळे हे तर मुख्यमंत्र्यांनीच सांगितले. समानअर्थी शब्द एके ठिकाणी सापडतात– आणि त्याला प्रतिशब्दही बनविलेले आढळतात. ह्या बनविलेल्या शब्दांची "प्राणप्रतिष्ठा" मात्र झालेली दिसत नाही. त्यामुळे त्यापासून बोध होण्यास अडचण पडते. स्थापना, आस्थापना, प्रस्थापना, हे शब्द सुंदर दिसतात; वाटतातही तसे; पण त्यांचा अर्थ कुणाला सांगता येईल का ?



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

योजानाति स पंडित:

अशापैकी हे आणि तत्सम इतर अनेक शब्द आहेत. समादेश, राजादेश, व्यादेश, महादेश (पृ. ३९७) ह्यांचा अर्थ कुणाला कळेल का? सरकारी अधिकाऱ्यांची मुशाफरीतील ठिकाणे सुद्धा अशीच गोंधळात टाकणारी आहेत: विश्रामभवन; अतिथिभवन, विश्रामगृह, पथिकाश्रम (पृ. १४७) ह्या समानार्थी शब्दांमधील भेदाभेद उमगणे सोपे नाही. स्थिति–सुधार, सुधारणा, उन्नति, उद्धार (पृ. ६३); नीलप्रत, रेखन, रेखाकृती, आरेखन, आराखडा, रेखाचित्र, अनुरेखन (पृ. ६८); काफे, आहारिका, आहारगृह, खाद्यगृह, हॉटेल, भोजनालय, (पृ. ४८५) इत्यादि शब्दांचे तसेच! काफे हा शब्द आणि आहारिका याचे मूळ एकच असता काफे हा काफेटेरिया याचा संक्षेप असता दोन्हीसाठी दोन निराळे शब्द असावे, हे रास्त समजावे काय?

कोश आणि ज्ञान-कोश यामधील फरक ध्यानात घेऊन म्हणावेसे वाटते की या कोशात अर्थ देण्यात थोडा चिक्कूपणा झाला आहे. रुंद मापी, मीटर मापी, अरुंद मापी हे शब्द बव्हंशी रेल्वेशी संबंधित आहेत; तेव्हा "रुंद" म्हणजे निश्चित किती आणि हे माप कशाचे, ही माहिती अपेक्षित होती. नील-पुस्तक, श्वेत-पुस्तक यांचेही तसेच. त्यांचा स्पष्ट अर्थ सांगण्यास कोश-कारांना कोणी "प्रतिषेध" तर केला नाही ना? कमोड, कमोडर, डिव्हिजन, नझूल, लिंट, ग्रोस, सीझरी, या शब्दांचे अर्थ का सांगितले नाहीत? सागरी मैल एवढा अर्थ सांगितल्यावर 'साध्या' मैलापेक्षा तो छोटा का मोठा का बरोबर हे सांगावयास हवे. पण ते टाळले आहे. सुवर्ण, हीरक आणि रजत हे महोत्सवाचे प्रकार सांगितले आहेत; पण त्यांचा अर्थ (५०, ६० आणि २५ वर्षांचे) हे सांगता आले असते पण प्रत्येक ठिकाणी हात आखडता!

आता काही ठिकाणी दिलेले अर्थ पहा. गोंद आणि सरस यामधील फरक समजलेला दिसत नाही. "ऊति" शास्त्र म्हणजे काय हे सांगितले नाही. सेतु प्रणाल याचा स्पष्ट अर्थ कळत नाही. विधी–निर्मित यांतील "विधि" हा शब्द "कायदा" या अर्थी वापरला आहे. विधि– निर्मिती ह्या जोड शब्दा-मुळे ब्रह्मदेवाची आठवण होते. लोको– मोटिव्ह याचा अर्थ (रेल्वे) इंजिन सांगितला नाही. चोर–घंटी म्हणजे लपविलेली घंटी नसून चोर आले की समजावे म्हणून वाजणारी घंटी असा मध्यम-पदलोपी वेगळा अर्थ लावला आहे. "बफर" चा मध्यगत एवढा अर्थ घेतला असून मृदंगासारखा उभय बाजूने वाजविता येणारा हा अर्थ टाळला आहे. "क्रेन" याचा अर्थ पक्षी-विशेष











राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

आहे, हे लक्षात आलेले दिसत नाही. आजीविका, व्यवसाय, पेशा हे तीन प्रकारचे कर वास्तविक समान अर्थी आहेत – कॉलिंग, ऑक्युपेशन आणि प्रोफेशन– पण तीन वेगवेगळे कर समजावे काय ? विक्रिकर आणि विक्रेय वस्तु कर हे भिन्न कसे ? येथे दिलेले २८ प्रकारचे कर आणि पेशवाईत रूढ केलेल्या 'पट्टचा' यात बरेच साम्य दिसते.

आधुनिक संभाषणात, परिसंवादात किंवा सरकारी निवेदनात आढळणारे कांही शब्द शाब्दको–कारांना का सुचले नाहीत, कळत नाही. पोलरायझेशन, इन्फरास्ट्रक्चर, हार्ड-सॉफ्ट-वेअर, फिलॅटेली, लाँग-क्लॉथ, टेप-वर्म, टेप-रेकॉर्डर, ईव्ह्-टीझर, रोमिओ, बिलियन, माइक, अंडरटेकर, यंग टर्क, इत्यादि शब्दांना या कोशांत मज्जाव का बरे असावा ? ब्राँझ म्हणजे कासे (कांस्य) समजण्यात गफलत होत आहे. कासे हे बेल-मेटल; आणि हा शब्द कोशातून बहिष्कृत आहे. "कॅरकॅस" हा (मानवेतरांच्या) पशूंच्या मृत देहाचा वाचक असून "शव" हे मानवी देहाला उद्देशून वापरतात. परी ऑन बोर्ड हा शब्द-संक्षेप सांगितल्यावर परी ऑन रेल्स किंवा सी. आय्. एफ्. हे संक्षेप का नाही घेतले ? दहा बारा प्रकारच्या समित्यांची नांवे सांगितली पण कमिटी ऑन अॅशुअरन्सेस ह्या अस्सल भारतीय कमिटीचा किंवा कमिटी ऑन पब्लिक अंडरटेकिंग्ज यांचा उल्लेख का टाळला ? रहदारी ऐवजी अप-प्रवेश, लागवड ऐवजी पिकाखालील, गूढ, कूट ऐवजी दुर्बोध, (पृ. १४३) अधिकार ऐवजी शक्ति (पृ. १९७), जामिनकी बद्दल निलंब–लेख (पृ. २०४), फुकट मोफत ऐवजी निःशुल्क, विना– मोबदला (पृ. २२५) दलाल, अडत्या ऐवजी मध्यजन (पृ. ३६०) अधिकारपत्राऐवजी मुखत्यारनामा (पृ. ४३५) खाद्यपेयगृह म्हणण्याऐवजी मधुशाला (पृ. ५५७) ... इत्यादि ठिकाणी सुबोधतेकडे, अर्थ समजण्याकडे कोशकारांचे लक्ष होते असे दिसत नाही. एवढी शलाका-परीक्षा पुरी मानली पाहिजे.

शिल्प आणि चित्र याबद्दल विचित्र कल्पना भाषा सल्लागार मंडळाची दिसते. क्राफ्टसमन म्हणजे शिल्पकारागिर--चित्रकार असे अर्थ त्यांनी दिले आहेत ते रास्त नव्हत. शिल्पकार चित्रकार यांना कलाकार हे सामान्य नाव लावता येईल. क्राफ्ट् याचा अर्थ नीट न उमगल्यामुळे हा घोटाळा झालेला दिसतो. मराठेकृत स्थापत्य-शिल्प कोश पाहिला म्हणजे क्राफ्टचा वास्तविक अर्थ समजतो. मी, तू, तुम्ही, आम्ही, तो, ती, ते, त्याचा, तिचा, त्यांचा, त्याला, तिला, आम्हांला ...अशी सर्वनामें वगळता आली असती. पण ती मुद्दाम पत्करली आहेत. शब्दसंख्या त्यामुळे कशी भराभर वाढते.

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

" गव्हर्नमेंट " चा काही ठिकाणी शासकीय व काही ठिकाणी सरकारी असा अर्थ दिला आहे, सरकारी रुग्णालय पण शासकीय धान्यागार, शासकीय विधेयक पण सरकारी वचनपत्र; असा लहरीपणा ह्या कोशात आढळतो. ऑफिशियल बद्दल मात्र एकजात शासकीय हा शब्द पत्करला आहे. " ड्राय " शब्दाचा लाक्षणिक अर्थ सांगितला नाही. खारीक हा कच्चा खजूर आहे. हे लक्षात न घेता ड्राय डेट म्हणजे खारीक असा अर्थ केला की काय ? कच्ची फळे सहसा वाळवीत नाहीत; सुकामेवा हा सर्व पक्क्या फळांचा असतो. भाज्या मात्र कच्च्या–पक्क्या दोन्ही वाळवितात. असो.

विद्यालयांतून संस्कृतची पद्धतशीर हकालपट्टी होत सामान्यजनापर्यंत सहज पोचण्याचा उद्देश मनात अशी संस्कृतमय बोजड परिभाषा ठरविणारानी " लोसाश " कडे थोडे लक्ष द्यावे. त्यांतील बव्हंशी संस्कृत शब्दांची अपभ्रष्ट रूपे पहावी आणि ही नव्या टांकसाळीतली क्लिष्ट नाणी त्यांच्या हाती द्यावी. साध्या स्त्रीला अस्तुरी, अस्तोरी, आस्तुरी, इस्त्री अशा स्वरूपात हिंडावे लागते; विस्तवाचा जिथं इस्तु होतो, तिथे--

न्यायसहाय्यक वैज्ञानिक प्रयोगशाळा
पुष्पसंवर्धनवेत्ता
द्रुतगति तोफखाना
पुनः स्थापन अनुज्ञप्ति
श्वानदंश उपचार

–अशा संस्कृत शब्दसमूहाची काय वासलात लागणार आहे याचा विचार शाव्यकोकारांनी करावा अशी नम्र विनंती आहे. कारण शब्द हे चालते नाणे असल्याने ते वापरणाऱ्याच्या कुवतीप्रमाणे त्यात फेरबदल होत असतात. सिमल्यात कचोरी दप्तर म्हणून आहे. ते अॅक्चुअरीचे ऑफिस होते. युकॅलिप्टसचा पर्याय लिटपिट का पेड असा भारतभर ठरला आहे. ही उदाहरणे शाव्यकोने लक्षात घ्यावी म्हणजे झाले.

शब्दकोश बनविण्याच्या ह्या झटपट रंगारी शासकीय प्रयत्नात कुणी तरी कुणाला बनवीत आहे असे वाटते. कारण सल्लागार समितीसाठी थोर थोर विद्वान निवडून, त्यांना निरनिराळ्या ठिकाणी हिंडवून, त्यांच्या बैठकींची शतके साजरी करून, शब्दकोश तयार होत नाही. सचिवालयाचे वातावरण तर त्यासाठी मुळीच सोईस्कर नाही. तरीदेखील विद्यापीठांकडील कार्य आपणाकडे घेण्याचे शासकीय अतिक्रमण आम्ही मुकाटयाने चालू दिले.


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

एकाही विद्यापीठाने विरोध केला नाही. ब्राह्मणांना दक्षिणा मिळते, आपण खो कशाला घाला अशी धार्मिक वृत्ती बहुतेकांची असल्याने, हे शासकीय कार्य चांगले झाले आहे असे म्हणवत नाही, खर्चाचे प्रमाण आणि घटिताची गुणवत्ता यांचा ताळमेळ घालू जाता निराशा पदरी पडते. महाराष्ट्र शासनाची महत्ता आतापर्यंत बरीच वरच्या दर्जाची राहिली. पण असली विद्यापीठाच्या कक्षेतली कामे पत्करून आमच्या शासनाने, आपले स्थान गमावले आहे. शब्दकोश बनविणे हे येरा गबाळाचे काम नोहे. ते विद्यापीठाकडे असणेच रास्त !

(२)

लोकसाहित्य शब्दकोश हे महाराष्ट्र लोकसाहित्यमालेतले १८ वे पुष्प. यावर संपादिका म्हणून डॉ. सरोजिनी बाबर यांचे नाव असून "संकलन" प्रा. गजमल माळी आणि डॉ. ग. मो. पाटील यांचे असे छापले आहे. पण शब्दकोशाचे संकलन म्हणजे काय ? श्री. ज्ञानेश्वर नाडकर्णी यांनी इंग्रजी अर्थ तपासला अशीही नोंद संपादकीयात आहे. तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी आणि चरित्रकोशकार चित्राव‌शास्त्री यांचा सल्ला घेतला असल्याचे समजते. एकंदरीने लोसाश-ची जन्मकथा बरीच रंजनकारी दिसते. अनेकांच्या नजरेखालून गेलेला हा कोश करताना अपार कष्ट वेचावे लागले आहेत. त्याची वारंवार फेरतपासणी होत गेल्याने एवढा वेळ लागला. हा पहिला वहिलाच प्रयत्न आहे इत्यादि सबब-पुराण सांगून परीक्षकांनी अभिप्राय लिहिताना "दृष्टी" कशी ठेवावी याबद्दल आवर्जून सूचना दिल्या आहेत.

लोकांच्या तोंडी असलेले साहित्य पिढयान् पिढया चालत आले असल्याने त्यात भाषेचे शुद्ध नागरी स्वरूप आढळत नाही. एक तर मुळातच भाषा ग्रामीणजनांची असते– आणि तिच्यात उच्चार सौकर्यासाठी देश-काला-नुसार फरक पडत जातो. तो फरक नीट हुडकून मूळ शब्द पारखणे हे अभ्यासकांचे काम असून त्याचे महत्त्व अलीकडे सर्वत्र पटले आहे. म्हणून विद्यापीठाच्या अभ्यासक्रमात हा विषय आला आहे. लोकसाहित्याचे "संकेत" कोश जागतिक प्रमाणावर तयार झाले आहेत. आणखी होत आहेत. परंतु अशा कामासाठी महाराष्ट्र लोकसाहित्यमंडळाने पुष्कळ साहित्य प्रसिद्ध केले असले तरी ते वापरता येत नाही. कारण त्याची शास्त्रीय छाननी, वर्गवारी, ठिकाणवारी, कालनिश्चिती, सूचि असा अभ्यास झाला नाही. "लोकसाहित्य" भरपूर प्रसिद्ध झाले तरी अशी अभ्यासू छाननी का होऊ नये असे कोडे मलाही पडले. म्हैसूरच्या भारतीय भाषा संस्थेचे अभ्यासक एतत्संबंधी मजशी पुष्कळ बोलले. परंतु पुण्यास खास विद्यापीठ असता, डेक्कन

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

कॉलेज सारखी संशोधन संस्था चालू असता लोकसाहित्य समिती शिक्षण-खात्याच्या आश्रयाने आपले काम करीत आहे, यात काही तरी राजकारण असावे. नाही तर विद्यापीठाची मान्यता अशा साहित्यास कां नसावी? आणि खऱ्या संशोधनापासून लोकसाहित्य समिती दूर दूर का रहाते ? फार काय, तमाम समितीच्या सभासदात विद्यापीठातील किंवा इतर ठिकाणचे संशोधक मुळीच आढळत नाहीत. यातही राजकारण आहे की काय? अथवा संशोधनाचे, विद्या-पीठीय मान्यतेचे महत्त्वच अद्याप लोकसाहित्य समितीला समजले नसावे. काहीही असले तरी ही अवस्था मोठी विचित्र आणि अनिष्ट आहे खरी. असो.

वर्णानुक्रमे शब्द, व्याकरण, जाती, लिंग ( वचनविभक्ति ) व्युत्पत्ति, अर्थ, इंग्रजी अर्थ उदाहरण, संदर्भ ... अशी आहे "लोसाश"ची रचना. अ ते अं आणि क ते ह या क्रमाने अक्षर माला स्वीकारली आहे. हा व्युत्पत्ति-कोश नाही. मूळ शब्दाचा अर्थ कळण्यास साहाय्यक म्हणून हा कोश उपयोगी पडेल, असे संपादकीय मत आहे.

"लोसाश"ची रचना कशी आहे हे सांगितल्यावर तिची गुणवत्ता ठरविली पाहिजे. अर्थ देण्यासाठी निवडलेल्या शब्दांबद्दल प्रथम पाहू. अर्थ समजावा म्हणून त्याचा उपयोग दाखविणारी अवतरणें देण्याची योजना सोईची आहे. पण त्या अवतरणातले इतर कठीण शब्द अर्थ देण्यासाठी निवडले नाहींत; त्यामुळे "लोसाश"ची उपयुक्तता कमी होते. गुणवत्ता खाली जाते. अफू, अब्दागिरी सोवदा, बाशिंग, गंगाजमना, इंगाळ, जबरदंग, एचत, चंद्रकळा, कळसूत्र, कौठं-करनी, पवळचा, लस, गुलसडी, मोकेड, चरोळ, चाटी, झिझी, झुना...अशी यादी पुष्कळ मोठी आहे. हे शब्द सर्व अवतरणांतले आहेत.

अर्थ देण्यातही स्पष्टपणाकडे लक्ष कमी दिसते आणि तो सांगतांना अनमान-धक्क्यावर अधिक भर ! उपलब्ध जुने-नवे कोश चाळले असते तरी पुष्कळ शब्दांचे अर्थ कळले असते ... उदाहरणार्थ- अडणीचा अर्थ तिवई असा सांगितला. आणि

> लाकडी पाटास खालून लावलेले दोन लाकडी खूर, पाटावर बसून समोर जेवणासाठी थोडी उंच केलेली तिवई किंवा चौरंग.

इतका लांबलचक खुलासा दिला. पांडव किती ? ह्या प्रश्नाचे २-३-४ अशा विविध अंकी उत्तर देणाऱ्या सारखेच हे लिहिणे वाटते. ह्या लेखकाला मराठी लिहिण्याची सवय मुळीच नाहीसे दिसते.

आड-लंका म्हणजे कन्याकुमारी हा एक तर्क आहे. कारण लोक-काव्यात आड-पड ह्या शब्दांचा उपयोग अनेक ठिकाणांबद्दल होतो.

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

इवान म्हणजे विमान– हवाई जहाज समजण्यात कल्पनेची भरारी– अधिक आहे. घराच्या, वाड्याच्या वरच्या भागाला "विमान" असे म्हणत असावे. कारण देवालय रचनेत विमान हा वरचा भाग येतो.

उंडा याचा अर्थ विस्ताराने सांगितला आहे : "उडीद आणि तांदूळ यांच्या पिठाचे गोळे करून ते शिजवून तयार करतात, तो खाद्यपदार्थ. यातील 'मिष्टता' कुठे गडप झाली ? उंडीचा अर्थ सांगतानादेखील असाच निरर्थक काल्पनिक विस्तार आढळतो : "लाडू, गोळा, पिंड, भिजवलेल्या पिठाचा गोळा ( भाकरी, पोळी तयार करण्यासाठी केलेला ) एक खाद्यपदार्थ." मग दहिभाताची उंडी यातला अर्थ काय समजावा ? एखळी म्हणजे एकली, एकुलती एक असा अर्थ दिला आहे. दिलेल्या अवतरणावरून तो बरोबर वाटत नाही. "माझी एखळी कार र" म्हणजे काय समजावे ?

काळी चंद्रकळा हे नाव का पडले ? आणि ह्याने कोणत्या प्रकारच्या लुगड्याचा बोध होतो, ते संपादिका स्पष्टपणे अधिकारवाणीने सांगतील असे वाटले. पण त्यानी तो शब्दच अर्थासाठी पत्करला नाही. अंजिरी हाही लुगड्याचा वाण; पण "अंजिराच्या रंगाचे" एवढाच साधा अर्थ त्यानी दिला. लाल ताणा –हिरवा बाणा मिळून अंजीरी वाण तयार होतो. त्याला "धूपछाव" असेही नाव आहे. विशेषतः कोटाचे कापड याच पद्धतीचे असते त्याला औत्तरीय धूपछाव ( धूपछाया ) म्हणतात. "फुटाणी" हा सुद्धा लुगड्या-खणांचा एक वाण आहे. आमच्या कोशकारांनी "खणाचा एक प्रकार" एवढेच सांगितले. आमच्याकडील लुगड्या– खणांतील वाणांचे, रंगस्वरूपाचे एक वैशिष्टच आहे. काळी चंद्रकळा ही छत्रीच्या कापडासारखी काळी नसते; तिचा काळा रंग ( निळीचे रंग प्रचारात होते म्हणून ) काळा– निळा असे. म्हणून त्या काळ्या वाणाची व लाल काठ्यांची सांगड घातलेले लुगडे "जांभळा" रास्ता म्हणत. अशाच निळ्या– काळ्या "जमिनी" वर छोट्या (दिडक्या) लाल चौकटी असत; त्यांचा मिळून होणारा फुटाणी ( फुटाण्याच्या टरफलांचा; काळ्या फुटाण्याचा नव्हे ) रंग.

कांदापात ही कांद्याच्या पातीप्रमाणे एक नक्षी आहे असे लोसाश कार म्हणतात. पातीची कसली आली नक्षी ? वास्तविक तो आहे मळखोर हिरवा रंग. कोवळ्या पानांचा, पोपटाचा हिरवा रंग वेगळा. आणि कांदापातीचा रंग निराळा. इंग्रजीत "बॉटल-ग्रीन" ( बाटलीसारखा हिरवा ) म्हणतात तसा. जुन्या खणांचे वाण पाहिले तर ते कांदापाती रंगाचे अधिक होते हे सहज दिसते. "गंगाजमना" बद्दलही येथेच सांगून टाकलेले बरे. हिरवे-



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

- तांबडे कांठ, किंवा एका लुगड्याच्या कांठांसाठी दोन प्रकारचे रंग (काळा – लाल; पिवळे लाल; जांभळे– लाल ) वापरले म्हणजे ते सनंग गंगा-जमनी म्हणतात. अलीकडे ही फॅशन खणांना, ( दाक्षिणात्यात ) धोतर-उपरण्यातही रूढ झाली आहे. स्त्री-वस्त्रविशेषांची चर्चा करावी लागेल असे वाटले नव्हते; पण लोसाश वरून दिसते की बांगड्यांच्या रंगा-नांवाबद्दलही अशी सविस्तर छाननी करावी लागेल. कारण रूढ प्रकार, नावे, रंग इत्यादिकांबद्दल माहिती कुणी मिळविलेली दिसत नाही. मग त्या विषयाचा अभ्यास व्हावा कसा ? आणि अभ्यासाविना कोश करण्यास धजावे कसे ? असो.

लोसाश चे वैशिष्टच म्हणजे आधुनिक प्राचीन यांत कांहीच फरक न मानता जुन्या–नव्याची एकत्र खिचडी केली आहे हे. सायकल, मोटर, आगिन-गाडी, डंकी, गणेशटेबल . . . . टपाल, कार्ड खुर्ची इत्यादि शब्दांवरून आंग्लाई-तले हे लोकसाहित्य स्पष्ट होत असता, ते सर्व एकाच मापाने मोजले. किंबहुना असेही म्हणता येईल की बव्हंशी आधुनिक साहित्य भराभर जमवून ते सर्व जुने आहे असे भासविण्याचा प्रयत्न होत आहे. न कळत असेल. आणि ह्याच कारणासाठी विद्यापीठीय संशोधकी कसोटी हवी.

गनेशटेबल हा कॉन्स्टेबलचा अपभ्रंश खरा; पण त्यावरून पुण्यातल्या गणेशचौकातले पोलिस ठाणे, हा अर्थ कसा निघतो ?

डंकीण : " शेताला पाणी देताना पाणी उपसून काढण्यासाठी तयार केलेले एक यंत्र " या लिखाणावरूनच कळते, मराठी लिहिण्याचा सराव नसलेल्याकडे हे काम सोपविले. डंकीण हा शब्द आपणाकडे रूढ झाला तो कापसासाठी जिनिंग प्रेस इकडे सुरू झाल्यानंतर. जिनिंग प्रेस चालविण्यास बॉयलर लागे आणि बायलरला पाणी पुरविणारा पंप त्याजबरोबर असे त्याला डाँकी म्हणत. गावठी उच्चार " डंकी " असा करीत. डंकीचे कुणी तरी डंकीण ( डाकिणीशी साम्य ? ) केले. अवतरण दिले आहे त्यात " जिना "चा उल्लेख आढळतो. त्या पंपाचा किंवा इतर पंपांचा शेतीसाठी उपयोग होत होता. म्हणून सर्व साधारण पंपाला डंकी, डंकीण असे म्हणू लागले. हा सामाजिक औद्योगिक इतिहास लक्षात घेतल्याखेरीज शब्द समजावे कसे ? म्हणूनच म्हणतात की प्रत्येक शब्दात पुष्कळसा सामाजिक इतिहास दडलेला असतो.

मराठी लिहिताना कोशकारांना किती प्रसववेदना होतात पहा : " कवळा " शब्दाचा अर्थ असा दिला आहे–



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

हाताला हात मिळवून होणारी पोकळी हाताच्या कवेचे किंवा वेंगेचे, मिठीचे परिमाण.

इंग्रजी अर्थाने तर यावरही ताण केली आहे. वास्तविक अर्थ ओंजळ एवढा अवतरणावरून सहज समजण्यासारखा आहे. तसे पाहिले तर राबेसाठी जमविलेल्या काटक्या, वाळके डहाळे, ( नांगराच्या ) रुमणीची खीळ, मिठी, मूठभर ( पसाभर ) घास, इत्यादि अनेक अर्थ "कवळ"चे आहेत.

गोठूल म्हणजे विश्रांतिगृह असे समजण्यात फार मोठी चूक होत आहे. गोंड समाजातील ह्या गोठुलाबद्दल व्हेरियर एल्विनचा एक स्वतंत्र ग्रंथच आहे. तो न पाहाता. त्याबद्दल अधिक चौकशी न करताच विश्रांतिगृह असा अर्थ सांगून वाचकांची दिशाभूल कोशकारांनी करावी, याचा खेद होतो.

जोट याचे दोन अर्थ दिले आहेत १) भारी रेशमी वस्त्र. २) भरभरीत जाडे सुती कापड, पांघरावयाची पासोडी. दोन्ही कसे लागू पडतील ? बळद म्हणजे—

धान्य साठविण्यासाठी भिंतीत अगर बाहेर ठेवलेला लोखंडी पत्र्याचा गोल उभट हौद, साठवण.

आम्हांस बळद म्हणजे तळघर हा अर्थ ठाऊक आहे. या पैकीं खरे कोण ?

हाडूळ याचा अर्थ जर्द एवढाच दिला आहे. फारशी भाषेंत जर्द म्हणजे पिवळा असा अर्थ होतो खरा; पण मराठीत पिवळा जर्द म्हणतात तसा तांबडा जर्द ही म्हणतात ! इंग्रजी अर्थ डार्क असा देऊन कोशकारांनी आणखी घोटाळा केला.

झाली एवढी छाननी पुरी झाली. कामांतली ढिलाई किंवा पुरेशी चिकित्सा न करता अर्थ सांगण्याचे धोरण व्यक्त झाले, हे ठीक.

विद्यापीठाचे किंवा संशोधन संस्थेचे बंधन न पत्करता सवता–सुभा स्थापून असली अभ्यासू कामे सरकारी खर्चाने वेगळी चालविण्याचे कारण समजत नाही, सल्लागार समितीतून अभ्यासू संशोधक तेवढे नेमके वगळण्याचा धूर्तपणा सहज समजतो. परंतु अशाने शिक्षणखात्याचा दर्जा खालावतो. सरकारी खर्च होत असल्याने अशा कार्याला विद्वन्मान्यता, विद्यापीठाचा पाठिंबा आवश्यक आहे. तो धुडकावून लावण्याच्या वृत्तीस औधत्य म्हणतात. असा प्रकार आमच्या शिक्षणखात्याने अतःपर चालू देऊ नये, अशी मंत्री महोदयांना खास विनंती आहे. संशोधन आणि विद्वत्ता या बाबतीत राजकारणी विचार आणू नये. पितळेला मुलामा चढविण्याच्या फंदात शिक्षणखात्याने पडू नये एवढीच इच्छा.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

(३)

मराठी भाषेचा तंजावरी कोश असे लांबचलांब नाव असलेला हा कोश मात्र अगदी निराळा आहे. सरस्वती महालातील एका हस्तलिखिताचे हे पुस्तक डॉ. तुळपुळे यांनी व्यवस्थित संपादिले आहे. सुमारे तीनशे वर्षांपूर्वी तंजावरी मराठी कोणत्या प्रकारची रूढ होती हे त्या कोशावरून कळते आणि कोश-काराच्या निवेदन कौशल्याची ओळख होते.

शहाजीचा दरबार बगरूळी भरत असे तेव्हापासून आणि व्यंकोजी तंजावरचा राजा झाल्यानंतर अनेक मराठी कुटुंबे राजाश्रयासाठी तिकडे गेली. प्रथमतः शहाजीच्या आश्रयास पूर्वीपासून काही जण असतीलच. ह्या रीतीने मराठे दक्षिणेत गेले. त्यांची मराठी भाषा त्यावेळी होती तशीच बहुधा चालू राहिली. तिजवर बाह्य परिणाम फारसे झाले नसावे. म्हणून त्या काळचे भाषा-स्वरूप हे अभ्यासासाठी उपयोगी. डॉ० तुळपुळे यांच्या परिश्रमाचे महत्त्व यामुळे लक्षात येते.

तंजावरात, सरस्वती महालसंग्रहातला भाषा प्रकाश ( रामकविकृत, पुणे १९६२) हा अमरकोशासारखा मराठी कोश डॉ. तुळपुळे यांनीच संपादिला होता. तेथील हा दुसरा मराठी कोश त्यांनीच संपादावा यात औचित्य साधले. कर्ता, त्याचा काळ, त्याचे वास्तव्य, त्याचे कौशल्य इत्यादी बाबींची विवेचक प्रस्तावना ( पृ.६-३१ ) त्यांनी लिहिली.

अप्पाराव काळे यांनी १७ व्या शतकात हा कोश रचिला. यातील शब्द अकार विल्हेने मांडले आहेत. सुमारे १० हजार शब्दांचा अर्थ तंजावरी पद्धतीने यांत दिला आहे. तंजावरातच राजव्यवहारकोश तयार झाला. मराठी अर्थ नीट समजावा म्हणून कोशकाराने " द्राविडी " भाषेत पुष्कळ शब्दांचे अर्थ दिले आहेत. ते तामिळ किंवा तेलगु असावे. एकंदरीने कोश बालबोध वाटतो आणि अर्थ व्यक्त करण्याच्या साधेपणामुळे तो वाचण्यास मौज वाटते.

" पोळी " चा अर्थ या कोशकाराने असा दिला आहे —

पातळ पुरणास पिठाची गवसन घालून
पातळ लाटून भाजिली भाकरी

त्याचप्रमाणे "उशी" चा अर्थ —

उशाखाले घेणेस केली रू भरीली पिशवी

खालील अर्थ सांगण्यातले कौशल्य तारीफ करण्याजोगे आहे; हे सहज

पटेल :—

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

"ओ" हाका मारली, त्यास आपण आहेसे कळविण्याचा गळा !
"तू" समोर जो बोलत आहे, त्यास म्हणावे.
"ढेकर" पोटात अन्न जिरऊन निघालेला वाऱ्याचा शब्द.
"डिंक" झाडांतून निघाली ते झाडाची मस्ती.
"तोरण" लहान आंब्याचे ढाळे लांब दोरीत गोवून अलंकारार्थ बांधणेची माळ
"दिवाळ" केला व्यापार बुडणे.
"दिवाळी" रात्री उदंड दिवे लावून नाहणेचा सण.
"पिंगा" मुलांनी अमोकसमोक उभे राहून माजावर हात ठेवून गाणी म्हणणेचा खेळ.
"पुडा" कागदाने हो, पानाने हो बांधिले गाठोडे.
"फुगडी" दोघी बायका येकीचे हात येकी येकीने धरून उभ्याने गात घेरे घेण्याचा खेळ.
"बाऊ, बागुल" लेकराचं भै दाखविण्याचा किडा.
"बाळसे" तान्ह्या लेकरास आलले मांसलपण.
"भटोडा" वैदिक बामण
"भट्ट" वैदिक बामणाचे विशेषण
"भाट" वाखाणणी करणारा भिकारी
"मळा" ऊस भाज्या विडयाची पाने वगैरे होणेचा बाग

– ही व्याख्या सोपी आहे आणि सोपेपणानेच हसू येते. परंतु कोशकारांचे शहाणपण आणखी एका प्रकारे दिसून येते.

गाढवी = बायको गाढव
छावी – हत्तीचे बायको पिल्लू
माकडी – बायको माकड
वाघीण – बायको वाघ

– याचा अर्थ त्याला मादी हा शब्द माहीत नाही असे म्हणवत नाही. कारण

चिमण्याची मादी चिमणी
मोराची मादी लांडोर
बोकुडाची मादी शेळी
नागसर्पीन –-नागीण
भिल्लाची बाईल भिल्लीण


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

–असे शब्द त्याने दिले आहेत. फार काय बकऱ्याची माय असाही प्रयोग त्याने केला आहे. परंतु ती मेंढी असा वेगळा अर्थ त्याने काढला आहे. मेंढी–मेंढरू म्हणजे "लोकरी–बकरे" असा अर्थ त्याने दिला आहे. पण लोकरी बकरे याचा अर्थ तो "जावळी बकरे– केसाळ बकरे" असा देतो. त्यावरून लोकर हा शब्द त्याच्या वेळी फारसा वापरात नव्हता असे वाटते. कांबळी, घोंगडी हे शब्द त्याच्या परिचयाचे आहेत.

कांबळी– केसाच्या सुताने विणिले कापड

घोंगडी– कांबळीची कुंची !

–असे अर्थ त्याने दिले आहेत म्हणजे कांबळ्याचे इरले केले की त्या इरल्यास घोंगडी म्हणत असे दिसते. हा सूक्ष्म भेद इतरही काही शब्दात आढळतो–

चामर : वनगाईच्या केसांची चवरी *

चवरी : शिंदीच्या पानाचे चामर

– नाच, नाचणे यात त्याने थोडा भेद केला आहे –

नाच : थाका (ठेक्या) नुसार हातपाय हलवणे.

नाचणे : नर्तन.

‡ पतंग हा शब्द त्याचे काळी रूढ नसावा.

वावडी : दोरा लावून वाऱ्यात उडविणेचे कागदी तडकर

– तद्वत "गुलाब" सुद्धा त्याला अपरिचित शब्द होता.

हिंदुस्तानी गुलाब : काटे–शेवंती

– असा खुलासा तो करतो. आणि शेवंती म्हणजे "उदंड पाकळ्यांचे पिवळे चपटे फूल– त्याचे झुडुप असा अर्थ तो देतो. "काजू" हा शब्दही त्याला नवीन आहे. "खुरासनी बिब्बा" असा अर्थ त्याचा दिला आहे. "खुरासान" म्हणजे इराणचा अफगाणिस्तानला लागून असलेला प्रदेश (राजधानी मशहद) म्हणजे इराणचा अफगाणिस्तानला लागून असलेला प्रदेश (राजधानी मशहद)

---

* केशेषु चमरीं हन्ति...

‡ पतंग : उदंड दिवस टिकणारा तांबडा रंग करण्याचे लाकूड या अर्थी तो रूढ होता.

" कोइतील गाभा " अशा अर्थी चारोळी शब्द त्याने वापरला असून ब (बा) दाम : खाण्याची एक प्रकारची चारोळी असा अर्थ तो देतो.

मोगलाई म्हणजे तुरुकाचे अधिकारातला देश; बुंदी लाडू म्हणजे गुंजा लाडू; घाई म्हणजे १) लटके हास्य; २) घोष आणि ३) राग-विलाप; लटांगण म्हणजे सोन्याच्या लाटा; वेद म्हणजे देवाज्ञा; सलाब म्हणजे मोती काढण्याचा उदीम; दमदमा म्हणजे बत्तेरी; ताडपत्री म्हणजे बारागी वातल्याले ( ? ) गर्भसुती कापड; लेखणी म्हणजे लिहिण्यासाठी केलेले कळकांच्या तुकड्याचे हत्यार...

इत्यादि माहिती नव्याने – नव्या रूपांत मिळत आहे. परंतु मासे ( गंगाफल किंवा सागरफल ) यांची बरीच नांवे याच्या कोशात आली त्याबद्दल आश्चर्य वाटते. कटारणा, ताडखवली, तंबूमासा, विंचुमासा, बाबी ( = वाब ), मारु, झिंगा, सोला ... अशी नावे या कोशात येतात. व्याजाला प्रतिशब्द कळंतर हा अधिक रूढ दिसतो. सवोत्तरा, दीडोत्तरा आणि तिनोत्तरा हे अनुक्रमे दर महा दर शेकडा सवा, दीड आणि तीन रु. व्याज आकारणीचे दर दिसतात. सरोद या हिंदुस्थानी वाद्याला रेशमी तारा लावीत होते. वेद आज्ञाधारक ते हिंदू आणि हिंदूचा देश तो हिंदुस्थान असाही अर्थ दिला आहे. टीच, वीत; हात ह्या लांबी मापाचे अर्थ त्याने स्पष्ट सांगितले आहेत. रंभाफल म्हणजे आपण केळे समजतो; पण या कोशांत " हिंदु-स्थानी चेकोता म्हणतात " असा अर्थ सांगितल्यावरून चकोत्रें ( पपनस ? ) अभिप्रेत आहे काय ? औत म्हणजे देवास जंगम जीवाची बळी देणे. हा अर्थ नवा दिसतो. जंगम म्हणजे जिवंत या अर्थी वापरलेला शब्द. मेहुणा म्हणजे चार प्रकारची नाती सांगितली आहेत : (१) बाइलीचा भाऊ (२) आत्याचा लेक (३) मामाचा लेक (४) मामाची लेक ( ? ) हल्ली आपण ह्या व्यापक अर्थाचा संकोच केला आहे काय ? अस्तु

एकंदरीने पहाता हा तंजावरी कोश किंवा याचा सहोदर भाषा–प्रकाश हे लोकसाहित्याला पुष्कळ उपयोगी. पण तिकडे कुणी पाहिलेले दिसत नाही. डॉ. तुळपुळे यांनी ही कामगिरी छान बजाविली आणि पुढील संशोधकांची सोय करून ठेविली याबद्दल त्यांना धन्यवाद !

–श्री. रा. टिकेकर



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

## नवभारत मासिक

प्रकाशन स्थळ : ३१५ गंगापुरी वाई.

प्रकाशन दिनांक : दरमहा एक तारीख.

मुद्रक : मधुकर शंकर साठे

जात : हिंदु.

पत्ता : दि प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी वाई.

प्रकाशक : वि. म. बेडेकर.

जात : हिंदु.

पत्ता : ३१५ गंगापुरी वाई.

–प्रा. वि. म. बेडेकर.

जात : हिंदु.

पत्ता : ७८३ शिवाजीनगर पुणे ४.

मालक : प्राज्ञपाठशाळामंडळ गंगापुरी, वाई

[ रूल नंबर ८, रजिस्ट्रेशन ऑफ् न्यूजपेपर्स सेंट्रल रूल्स १९५६ अन्वये प्रकाशित ].


अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# प्राज्ञपाठशाळामंडळ ग्रंथमाला

| | | |
|---|---|---|
| १. धर्मकोश– व्यवहारकाण्ड भाग १ ते ३ | | किंमत |
| | साधी बांधणी | ८०·०० |
| | कापडी बांधणी | १०४·०० |
| २. धर्मकोश - उपनिषत्काण्ड भाग १ ते ४ | | |
| | साधी बांधणी | १५०·०० |
| | कापडी बांधणी | १८२·०० |
| ३. धर्मकोश– संस्कारकाण्ड भाग १ ला | | ४५·०० |
| | कापडी बांधणी | ६३·०० |
| ४. मीमांसाकोश भाग १ ते ७ ( संपूर्ण ) | | २५०·०० |
| ५. कौषीतकिब्राह्मणारण्यकविषयकोश | | ६·०० |
| ६. बौद्धागमार्थसंग्रहः | | २०·०० |
| ७. वैदिक संस्कृतीचा विकास (सुधारून वाढविलेली आवृत्ती) ( तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी ) | | ३०,०० |
| ८. नवमानवतावाद | | २·५० |
| ९. मानवाचा आदर्श | | ३·०० |
| १०. चार्वाक – इतिहास आणि तत्त्वज्ञान ( प्रा. सदाशिव आठवले ) | | ३.०० |
| ११. गीता-प्रवेश (डॉ. गो. वि. देवस्थळी ) | | २.५० |
| १२. महाराष्ट्रांतील दुष्काळ व त्यावरील उपाययोजना (श्री. चा. अ. दाभोलकर ) | | २·०० |
| १३. सिंधु संस्कृती, ऋग्वेद व हिंदु संस्कृती (श्री. प्र. रा. देशमुख ) | | ४·०० |
| १४. इतिहासाचे तत्त्वज्ञान (प्रा. सदाशिव आठवले) | | ६·०० |
| १५. लोकशाहीचे धोके (श्री. पन्नालाल सुराणा) | | २·०० |
| १६. भारतीय स्त्रीधर्माचा आदर्श ( सौ. कमल पाध्ये ) | | २·०० |

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# दर्जेदार किर्लोस्कर एंजिनांना भारतीय मानक संस्थेचे प्रमाण पत्र

५ ते ८ हॉर्स पॉवर

IS 1601










प्रथम पासूनच किर्लोस्कर एंजिने त्यांच्या उत्तम दर्जाबद्दल प्रसिद्ध आहेत.
देशातील आणि परदेशातील असंख्य शेतकरी व इतर ग्राहक यांच्याकडे वापरात असलेली एंजिने हे याचे प्रतीक आहे.

आतां भारतीय मानक संस्थेने (ISI) देखील प्रमाणपत्र देऊन, हे मान्य केले आहे.




किर्लोस्कर एंजिन– शेतकऱ्याची पहिली पसंती

**किर्लोस्कर ऑईल एंजिन्स लि.**

१३, लक्ष्मणराव किर्लोस्कर रोड, खडकी, पुणे ३

® एंजिनसाठी किर्लोस्कर ऑईल एंजिन्स लिमिटेड यांनी या ट्रेडमार्कच्या उपयोगाचा अधिकार नोंदविलेला आहे.

Tom & Bay/KO-7315-M




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई